श्री.

# तीन द्रविड.

लेखक,

**लक्ष्मण गोविंद चाणेकर** बी. ए

( माजी सुभे, बडोदे राज्य. )

बडोदे. [illegible] "[illegible]सल" छापखाना

सन १९२३.

(1923)



किंमत [illegible] रुपाया.



# प्राचीन दक्षिण (द्राविड) हिंदुस्थान.

लेखक,

**लक्ष्मण गोविंद घाणेकर** बी. ए.

( माजी सुभे, बडोदे राज्य. )



**बडोदे**:—" बडोदा वत्सल " छापखाना.

सन १९३३.

किमत एक रुपाया.

हे पुस्तक बडोदे येथे रावपुऱ्यात, शास्त्री यांचे पोळेंत " बडोदा वत्सल " छापखान्यात रा. कृष्णराव रामचंद्र मराठे यानी लेखका करिता तारीख १७ मार्च सन १९३३ रोजी छापिलें.

# प्रस्तावना.



इसवी सन १९२३ चे उन्हाळयामध्ये सरकारी कामानिमित्त माझे नीलगिरीस जाणे झाले. फुरसद बरीच असल्याने तेथील स्थानीक माहितीची पुस्तके वाचण्यास मी सुरुवात केली; इतक्यांत हिंदुस्थानांतील पुराणवस्तुसंशोधक खात्याच्या शिलालेख शाखेचे मुख्य स्थान तेथेच असल्याचे कळून आले, व त्या शाखेचे मुख्य कै. रावबहादूर एच्. कृष्णशास्त्री यांचा आणि माझा परिचय होणाचा योग आला. हे गृहस्थ फारच विद्वान आणि थोर होते, त्यांनी मला लागेल ती माहिती आणि पुस्तके वगैरे देण्याचे आश्वासन देऊन त्याप्रमाणे फार उत्तम मदत केली, परंतु एक मोठी आणि अपरिहार्य अशी अडचण मला आडवी आली. मला कानडी किंवा तामील वगैरे दक्षिण हिंदुस्थानांतील प्रचलित भाषांचें मुळीच ज्ञान नाही, आणि प्राचीन शिलालेख त्याच भाषांत लिहिलेले; तेव्हां त्या लेखांची भाषांतरे इंग्रजींतून वाचून थोडीबहूत गोळा केलेली माहिती मी सादर करीत आहे. ह्या माहितीपासून वाचकास तादृश ज्ञान होईल असें मला वाटत नाही, आणि तसा माझा हेतुहि नाहीं. द्राविड अथवा अनार्य संस्कृति आर्यांच्या हल्लयापुढे दक्षिणेस हटत जाऊन दक्षिण-हिंदुस्थान हे जसे तिचे शेवटचे विश्रांतीस्थान झाले, तोच प्रसंग महमदी धर्मानुयायांच्या हल्लयापुढें वैदिक संस्कृतीवरहि येऊन गुदरला, आणि आर्य संस्कृतीच्या बऱ्याच अविकृत स्वरूपाचे ज्यांस निरीक्षण करावयाचें असेल, त्यांस दक्षिण हिंदुस्थान म्हणजे केवळ सोन्याची खाण आहे; परंतु या गोष्टीकडे तज्ज्ञांचे जेवढें लक्ष जावयास पाहिजे तेवढे अद्याप गेलें नाही असे माझ्या अल्प समजुतीस वाटते आणि तें तिकडे वेधावे हाच ह्या माझ्या अल्प प्रयत्नाचा हेतु आहे.

ह्या पुस्तकांत एकसूत्रीपणा दिसावयाचा नाही. दक्षिण हिंदुस्थानचे व नीलगिरीचें सामान्य वर्णन देऊन नंतर ह्या प्रदेशांतील लोक, त्यांचे आचार-विचार, प्राचीन राज्यव्यवस्था, ग्रामसंस्था वगैरेचें त्रोटक वर्णन,

व्यापार-रोजगार, शिल्पकला, तिकडील देवळे वगैरेंची माहिती व त्यांच्या अनुसंधानानें तिकडील राजवंशाचीहि थोडीशी माहिती प्रसंगोपात्त दिली आहे. त्याचप्रमाणें भोसले, काठेवाडांतील जुनागडचे " राह " राजे, कोंकण वगैरे शब्दांच्या व्युत्पत्त्या, प्राचीन शिलालेख वगैरेवरून, माझ्या अल्प मतीस, सुचल्या तशा देण्याचा प्रयत्न केला आहे; तसेच प्राचीन दाक्षिण हिंदुस्थानच्या माहितीवरून रामायण, महाभारत वगैरेत असणारी आख्यानें-उपाख्यानें जी आज कोड्यांसारखी दिसतात त्यांचा अंशतः उलगडा होण्यासारखा आहे असे माझ्या निदर्शनास येऊन तो उलगडा मी यथामति केला आहे. शिवाय कानडी भाषेच्या मराठीवरील व गुजराथीवरील पगड्याची काहीशीं कल्पना येण्याकरितां त्या दोन्ही भाषांत हल्ली प्रचालित असलेले परंतु कन्नडोद्भव अशा शब्दांची यादी दिली आहे. सन १९०९ साली बडोद्यास मराठी साहित्य परिषद भरली होती तिजपुढे मी मोडी लिपीवर एक लहानसा निबंध वाचला होता व तो श्री. चिंतामणराव वैद्य व श्री. नरसिंह चिंतामण केळकर वगैरे मंडळीस बराच पसंत पडला होता असे दिसले. सदर संस्थेच्या त्या सालच्या रिपोर्टांत हा निबंध ' टाईप ' वगैरेंच्या अडचणीमुळे छापला नव्हता, परंतु मागाहून तो छापण्याची व्यवस्था चालक करणार होते असे त्या रिपोर्टावरून दिसते, परंतु पुढे ती गोष्ट विस्मृतीत गेली असावी. हल्लीं परिशिष्ट रूपाने तो ह्या पुस्तकांत छापला आहे. देवनागरी, गुजराथी, प्राचीन क्षत्रप, अशोक, ब्राम्ही वगैरे लिपी आणि अर्वाचीन मोडीची ह्या लिप्यांवरून व विशेषतः देवनागरीवरून सिद्धता होते ते लक्षांत येण्याकरिता ह्या सर्व लिपीचा एक नकाशा ( Chart ) ही जोडला आहे.

सारांश पुष्कळशा गोष्टींचा हा एक चिवडा मी वाचकांस सादर करीत आहे, त्याच्या चर्वणाने दाक्षिणात्य पंडितांचे व इतिहासकारांचे आणि गुर्जर पंडितांचे अल्पांशाने का होईना, दक्षिण हिंदुस्थानाकडे लक्ष वेधल्यास ह्या लेखाचे सार्थक होईल. कानडी भाषेच्या अज्ञानामुळे पुस्तकांत चुका असण्याचा संभव आहे त्याबद्दल वाचकांच्या क्षमेची याचना करितो.

मराठी न समजणारे गुर्जर व कन्नड पंडित व इतिहासकार ह्यांच्याही अवलोकनांत ह्या पुस्तकांतील कांही भाग आल्यास बरें, असे वाटल्यानें ते भाग मीं इंग्रजींत लिहिले आहेत. उदाहरणार्थः—जुनागडचे राह राजे, व कोंकण, भोसले वगैरे शब्दांच्या व्युत्पत्त्या मुद्दाम इंग्रजींत लिहिल्या आहेत, तसेच गुजराथींत व मराठींत प्रचलित असलेले शब्दहि इंग्रजींत लिहिलें आहेत.

ह्या पुस्तकांत कांहीं ठिकाणीं द्विरुक्तीचा दोषहि झाला आहे, विषय समजण्या करितां तो तसाच राहूं दिला आहे त्याबद्दल मी वाचकांची क्षमा मागतों.

हें पुस्तक बडोदा वत्सल छापखान्याचे मालकाकडेसहि विकत मिळेल.

| | |
|---|---|
| बडोदे ता. २९ ऑगष्ट<br>सन १९३२. | वाचकांचा नम्र सेवक,<br>**लक्ष्मण गोविंद घाणेकर.** |





# अनुक्रमणिका.



## परिशिष्टें.

# प्राचीन दक्षिण हिंदुस्थान.

## दक्षिण हिंदुस्थानचें सामान्य वर्णन.

### भौगोलिक माहिती.

दक्षिण हिंदुस्थान म्हणजे काय ? ह्या प्रश्नास नर्मदा नदीच्या दक्षिण तीरापासून तो तहत कन्याकुमारिकेपर्यंतचा प्रदेश असे उत्तर प्रथमतः द्यावेसे वाटते. लोकमान्य टिळकांचें मत असे होते की, एका काळीं नर्मदेपर्यंत लोक द्राविडी भाषा बोलत असत. कर्नाटकी भाषेची गुजराथी आणि मराठी या दोन्हीं भाषांवर बरीच छाप आहे, ह्या गोष्टीची थोडीशी जाणीव दाक्षिणात्यांस आहे; परंतु गुर्जर पंडितांस मुळींच नाहीं; परंतु त्या संबंधाचा विचार येथेच कर्तव्य नाहीं. बऱ्याच प्राचीन शिलालेखांत कृष्णा नदीच्या दक्षिणेकडील मुलुख म्हणजे दक्षिण हिंदुस्थान असे मानले जात असे. कृष्णेस कानडीमध्यें पेडोर किंवा हेडोर असें नांव आहे व त्याचा अर्थ मोठी नदी असा आहे. हाच पेडोर शब्द तुंगभद्रा नदीसहि लाविलेला प्राचीन लेखांत आढळतो. आज मितीस कृष्णेच्या उत्तर तीरावरील कानडीचे साम्राज्य अगदींच नष्ट झालें आहे असें म्हणण्यास चिंता नाहीं, परंतु या नदीच्या दक्षिणेकडे ते पुष्कळ आहे; आणि तुंगभद्रेपासून दक्षिणेकडे तें अगदी जागतीज्योत आहे. ह्या गोष्टीस दुसरीहि एक पुष्टि मिळते. दक्षिणेकडील क्षत्रिय राजे क्वचित् नर्मदा ओलांडून उत्तरेस गेल्याचा दाखला आहे; परतु या सर्व राजांमध्यें जे पराक्रमी असत, त्यांस आपल्या राज्याची मर्यादा कृष्णेस नेऊन भिडविल्याशिवाय आपण सम्राट् पदवीस योग्य झालों असें वाटत नसे, आणि तेथपर्यंत ती भिडविण्याकरितां ते अटोकाट प्रयत्न करीत असत असे दिसतें. प्रस्तुत लेखासाठीं आपण दक्षिण हिंदुस्थान या शब्दाचा अर्थ कृष्णा नदीचे दक्षिणेकडच्या हिंदुस्थानाचा भाग असें मानून चालू. ह्या प्रदेशामध्यें सर्व मद्रास इलाखा, म्हैसूर, त्रावणकोर वगैरे एतद्देशीय राज्यें आणि निजामाचें राज्याचा फारच थोडा भाग एवढीं समाविष्ट होतात.

दक्षिण हिंदुस्थान म्हणजे काय ?

ह्या प्रदेशाचे पश्चिमेस सह्य पर्वताची रांग थेट दक्षिण समुद्रापर्यंत आहे; ह्या रांगेमध्यें पालघाटापाशीं सुमारें ४०-५० मैलांची खिंड आहे आणि तेथेंच नीलगिरी पर्वत आहे. ह्या खिंडीमुळें कित्येक भूस्तरशास्त्री नीलगिरी पर्वतास स्वतंत्र पर्वत मानतात, तर कित्येक त्यास सह्य पर्वताची शाखा मानतात. पूर्वेस पूर्वघाट ही डोंगरांची ओळ आहे. ती मच्छलीपट्टण, राजमहेन्द्रीनजीक पूर्वेस सुरू होऊन कांहीं काळ थेट दक्षिणेस जाऊन नंतर पश्चिमेकडे वळते व नीलगिरी पर्वताशीं संधी करते. दक्षिणेस हिंदी महासागर असून उत्तरेस कृष्णा नदी व निजाम सरकारचें राज्य हीं आहेत.

सीमा.

हिंदुस्थानचें दक्षिण टोंक (विषुव) भूमध्यवृत्ताचें अगदीं जवळ म्हणजे तीन चारशे मैलांवरच असल्यानें ह्या प्रदेश अत्यंत उष्ण आहे; व सामान्यत: लोकांचा वर्ण कृष्ण असा आहे. ह्या उष्णतेमुळें इकडे अभ्यंग म्हणजे तेल पुष्कळसें लावून स्नान करण्याची फार चाल आहे. "यथा देहे तथा देवे" ह्या न्यायानें इकडे देवसेवेकरितां दिलेल्या देणग्यांत तेल काढण्याचें हातघाणे किंवा चरकहि दिलेले आढळतात. अंगास व विशेषत: डोक्यास तेल लावण्याचे चालीमुळें कीं काय कोण जाणे, इकडील स्त्रिया व पुरुष यांचे केश काळेभोर आणि लांबसडक असतात, व इकडील लोकांस केश वाढवून ते लांब ठेवण्याचा आणि त्यांत फुले वगैरे घालून ते अलंकृत करण्याचा फार शोक असतो. एका श्रीमंत वकीलाच्या सुमारें पंधरा सोळा वर्षांच्या वयाच्या मुलाच्या लांब व सडक वेणींत गोंडेफुलांप्रमाणे फुलें घालून नव्या नवरीप्रमाणें त्यास नटविलेला माझें पाहण्यांत आला होता. उष्णतेमुळेंच अंगावर वस्त्रप्रावरण हे अगदींच कमी घेतात. कमरेभोंवतीं एक सुमारें पांच सहा हाताचा पंचा कासोटा न घालतां गुंडाळणें हा मुख्य पोषाक. तेवढ्याशिवाय अंगावर दुसरें कांहीं वस्त्र नसलें तरी चालतें व गरीबींत असलेल्या ब्राह्मणांच्या अंगावर दुसरें वस्त्र बहुधा नसतें. तथापि हल्लीं पंचावर शर्ट शहरांतून दृष्टीस पडूं लागलें आहे. सकाळचे प्रहरीं

लोकांचें सामान्य वर्णन.

स्नान करून व डोईवरचे केस विचरून—पिंजून म्हटले तरी चालेल, आणि ते मोराचे पिसाऱ्याप्रमाणे फुगवून व पाठीवर सोडून, ते उडवीत व मोराप्रमाणे डौलदार पावले टाकीत जात असतां मद्रासेत पुष्कळ लोक दृष्टीस पडतात, तथापि इंग्रजी सरपट—कात्री फिरल्यामुळे आंखूड झालेले केसहि वाढत्या प्रमाणांत दिसतात. उपासनादर्शक भस्म, गंध, नाम, त्रिपुंड, मुद्रा वगैरे धारण करण्याचाहि प्रघात इकडे फार आहे. शूद्र लोकहि कपाळावर मोठे लांब आडवे गंध किंवा पुष्कळसें भस्म धारण करितात. स्त्रियाहि भस्म लावितात. मी नीलगिरीस गेल्यावर थोड्याच दिवसांनीं एकदां रस्त्यांत जात असतां माझ्यापुढे एक १०—१५ माणसांची टोळी चालतांना दिसली. त्यांचे सर्वांचे कपाळीं मोठे थोरले भस्माचे किंवा गंधाचे पट्टे होते. दुरून मला ही एकाद्या ब्राह्मणाची स्मशानयात्रा असावी असा भास झाला व मी जपून आणि बाजूस होऊन पाहतों तों एका भल्या मोठ्या शिकार केलेल्या वराह अवताराची, बडगे नांवाच्या जंगली लोकांनीं काढलेली ती स्मशानयात्रा आहे असें पाहून मी चकित झालों. त्याचे अग्नीकरण त्यांच्या जठरांत झाले असेल हे सांगणें नलगे.

हा प्रदेश फार उष्ण आहे असें वर सांगितलेंच आहे. हिंदुस्थानच्या इतर भागांप्रमाणे येथेंहि दोन पावसाळे आहेत. परंतु पहिल्या हप्त्यांत म्हणजे जून पासून आक्टोबर पावेतों पाऊस अगदीं जुज पडतो व खऱ्या पावसाळ्यास आक्टोबरचे मध्यावर सुरुवात होऊन तो थेट डिसेंबर, जानेवारी महिन्यापर्यंत पडतो. ह्या दुसऱ्या पावसाळ्यांत कधीं कधीं फार मोठी वादळे होतात. सन १९२२ सालीं माझा मुक्काम तेथे असतां पश्चिमेस कारवार जिल्ह्यांत, पूर्वेस विजगापट्टण, कटक वगैरे जिल्ह्यांत आणि अगदी दक्षिणेस तिनवेल्ली जिल्ह्यांत फार भयंकर वादळे व अतिवृष्टि होऊन शेकडो कोसांच्या मुलुखांत पिकांची नासाडी होऊन बरीच प्राणहानीहि झाली होती. इकडे गरमी अगदीं असह्य असते. खालीं सुंदर दगडी इमारत असून तिसरा मजला वेळूच्या कुडाचा व गवताने आच्छादलेला अशीं घरे मद्रासेंत दिसतात.

ह्या देशाचे पश्चिमेकडील सह्याद्रीची रांग तिच्या उत्तरेच्या भागापेक्षां जास्त उंच असावी असे मला वाटते. उत्तरेस फार उच अशीं शिखरें म्हटलीं म्हणजे भीमाशंकर, महाबळेश्वर वगैरे होत. ह्यांची उंची पांच हजार फुटांपेक्षां जास्त नाहीं; परंतु दक्षिणेस नीलगिरीचे डोड्डाबेट्टा हे शिखर ८७६० फूट उंच आहे. सुमारे सहा हजार फूट उंचीची शिखरे पुष्कळच आहेत. ह्या शिखरांतील कांहीं फार पूज्य मानली जातात. म्हैसूर राज्यांतील सह्याद्रीचे रांगेंत वराह नांवाचें शिखर आहे. ह्या शिखरास दोन टोके आहेत. ह्यास श्रीविष्णुचा वराह अवतार मानतात. त्याची दोन टोंके त्या वराहाच्या दोन दंष्ट्रा होत. इकडील शिलालेखांत श्री विष्णूचे प्रशस्तींत "दक्षिणोन्नत दंष्ट्रः" असें विशेषण वारंवार आढळतें आणि त्याचे कारण वराहाचे दक्षिण टोंक विशेष उंच आहे. चन्द्रद्रोण हें पुराणांतील नांव, परंतु हल्लीं "बाबाबुद्धण" ह्या नांवानें प्रसिद्ध असलेले शिखर व पर्वत ह्यावरच प्रथम कॉफीची लागवड झाली. लक्ष्मण इंद्रजिताचे शक्तीने विद्ध होऊन आसन्नमरण झाला असतां मारुतीने जो द्रोणगिरी उचलून आणल्याची कथा रामायणांत प्रसिद्ध आहे किंवा आजच्या दृष्टीने बोलावयाचे म्हणजे ज्यावरून मारुतीनें वनस्पतींचा भारा आणिला, तो हाच द्रोण पर्वत असे मला वाटते. कित्येक द्रोण पर्वत म्हणजे "अबू पर्वत" असे म्हणतात. आजच्या दृष्टीस हे म्हणणें पटण्यासारखे नाहीं. तुंगा आणि भद्रा या नद्यांचा उगम ज्या गिरिशिखरांतून झाला आहे, त्यास "गंगामूळ" असे म्हणतात. हरिद्वाराचे जुने नांव गंगाद्वार असे आहे आणि ते अगदी योग्य आहे. हिमाचल ओलांडून भागीरथी नदी ह्या गंगाद्वारापाशींच सपाट प्रदेशांत आली आहे. त्र्यंबकेश्वरास गोदावरीच्या उगमासहि गंगाद्वार असें नांव आहे; आणि वर सांगितल्याप्रमाणें दक्षिणेस फार पवित्र मानल्या जाणाऱ्या तुंगभद्रा नदीचे उगमासहि गंगामूळ असें नांव आहे. आर्य लोकांनी उत्तरेकडून दक्षिणेकडे येतांना तिकडील पवित्र नद्या, क्षेत्रें, शहरें व गांवें ह्यांची हीं नांवें आपल्याबरोबर आणिलीं आणि तीं नव्या नद्या, क्षेत्रें, पर्वत वगैरेस दिलीं. ह्यावरून अमेरिकेतील "न्यूइंग्लंड" "न्यूयॉर्क" वगैरे नावांची आठवण होते. पूर्वेकडील डोंगरांची रांग फार उंच नाहीं म्हणून त्यांत प्रसिद्ध शिखरें नाहींत.

नीलगिरी पर्वतासंबंधाने दोन शब्द स्वतंत्र लिहावेसें वाटतें. हा पर्वत म्हणजे निसर्गदेवतेची एक अगाध लीला आहे. काठेवाडांतील गिरनार पर्वताप्रमाणेच भूगर्भांतून ज्वालामुखीच्या जोरानें एखाद्या उपटसुळाप्रमाणें सह्याद्रीशीं फारसा लागाबांधा न ठेवतां हा एकाएकीं वर आलेला आहे. ह्याचे अत्युच्च शिखर जे " डोड्डाबेट्टा " तेवढें शिखर खुद्द सह्याद्रींत मला वाटते नाहींच. लता, तृण आणि वृक्ष यांनीं हा पर्वत सदोदित आच्छादित असल्याने व ह्याचे शिखरावर मेघराजांनीं आपले प्रासाद कायमचे बांधले असल्यानें ह्यास नीलगिरी असें अन्वर्थक नांव मिळालें आहे. म्हैसूरचे बाजूने ह्यावर चढून जाण्याचा घाट जवळ जवळ २० मैल लांबीचा आहे. नीलगिरीवरील प्रदेशास काश्मीरचें प्रतिबिंब म्हणतात व दक्षिणेकडे हा हिमालयाची वाण पडूं देत नाहीं. रेल्वेच्या चढणीची सुरुवात पूर्वेकडून सालेम नांवाच्या प्रसिद्ध शहरापासून थोड्या अंतरावरून होते. घाटतळच्या स्टेशनाचें नांव मेट्टुपल्लायम् असे आहे व शेवटल्या स्टेशनाचें नांव उटकमंड असें आहे. इंग्रज लोकांचे " उटी " ते हेच. घाटमाथ्यापर्यंत एकंदर स्टेशने आठ असून घाटरेल्वेची लांबी सुमारे ३० मैल आहे. घाटतळच्या मेट्टुपल्लायम् ह्या स्टेशनवर इतके उकडत असते कीं, जीव नकोसा होतो आणि अंगावर तलम कपडाहि ठेववत नाहीं. तिसरें स्टेशन सुमारें २५०० फूट म्हणजे माथेरान एवढ्या उंचीचें असून तेथील हवा थंड वाटूं लागते आणि मनास आल्हाद वाटतो. मेट्टुपल्लायम् येथे उन्ह कडक पडलेले असून आकाशांत मेघाचे नांवहि नसते; परंतु शेवटचे स्टेशन जे उटकमंड तेथे पाऊस शिलाधार पडत असतो आणि अंगांत लठ्ठ ओव्हरकोट घालूनहि दांतखिळी वाजण्याचे बंद होत नाहीं. सप्टेंबर महिन्यात इकडून एखादा मनुष्य जाऊन मेट्टुपल्लायम् येथें राहिला आणि " उटी " हून खालीं येणाऱ्या एखाद्या गृहस्थाचे बोचक्यांत जर त्याने रेनकोट, ओव्हरकोट, हातांत पावसाळी छत्री वगैरे वर्षाकाळास तोंड देण्याची जय्यत तयारी पाहिली तर खाली येणाऱ्या गृहस्थाचा धंदा राजरोस उचलल्याचा आहे असे त्यास वाटेल. ह्या पर्वतावरील पठार सुमारें ४० मैल लांब रुंद असून

सर्व पठारभर उत्तम सडका केल्या आहेत, त्यामुळे खटाऱ्यापासून तों मोटारीपर्यंत कोणत्याहि वाहनांत सुखानें प्रवास करतां येतो. एवढे मोठे पठार केवळ घरांनीं व्यापणे शक्यच नाहीं. मधून मधून वस्ती असून बाकीच्या भागांत चहा, कॉफी, बटाटे व इंग्रजी भाज्या आणि फळफळावळीचे उत्तम बागाईत आहे. हिमालयांत देवदारु नांवाचे गगनचुंबी वृक्ष असून त्यांचें सौंदर्य अवर्णनीय आहे. येथें ते वृक्ष नाहींत, परंतु त्यांची जागा दुसऱ्या एका वृक्षानें भरून काढली आहे. युक्यालिप्टस् किंवा ब्ल्युगम नांवाच्या झाडाची एका इंग्रज गृहस्थानें प्रथम येथे लागवड करून पाहिली. हें झाड मूळ " ऑस्ट्रेलियांतील " आहे. येथील हवामान आणि जमीन ह्या झाडास इतकी अनुकूल दिसतात कीं, हल्लीं सर्व उटकमंडभर ह्या झाडांच्या वनराई आहेत. ह्यांचीं पानें कण्हेरीच्या पानांच्या आकाराचीं परंतु जास्त लांब रुंद अशीं असतात. झाडास फांद्या मुळींच फुटत नाहींत म्हटले तरी चालेल. सागाच्या झाडाप्रमाणे ह्याच्या बुंध्याचा सोट १७५-२०० फूट उंचीपर्यंत एकसारखा अगदीं सरळ जातो व त्याचा शेंडा उत्तम रीतीने पानांनीं भरलेला असतो. ह्यांची इतकी दाट झाडी होते कीं भूतलावर सूर्याच्या किरणांचा प्रवेशहि होऊं शकत नाहीं, व सावटामुळे तेथे गवत किंवा झुडपे उगवत नाहीत, त्यामुळे झाडीचे आंतील भूमिप्रदेश अगदीं स्वच्छ असतो. झाडांचे सोट स्वच्छ व संन्याशाच्या डोईप्रमाणें गुळगुळीत असतात व वनश्रीच्या लग्नमंडपासारखे ते शोभिवंत दिसतात. ह्या झाडाच्या पानांत एक प्रकारचे तेल असतें. त्यास तीक्ष्ण कापरासारखा सुगंध असतो. हें तेल काढण्याचे येथें कारखाने आहेत. त्या तेलास "निल-गिरी ऑईल" म्हणतात. ते संधिवात, शीतज्वर वगैरे रोगांवर फार गुणकारी आहे असें म्हणतात. पूर्वी ह्या पर्वतावर शीतज्वराचा उपद्रव फार असे, परंतु ह्या झाडाची लागवड झाल्यापासून तो नाहींसा झाला आहे, असें तेथील रहिवाशी म्हणतात. पानखर ऋतूमध्यें या झाडाचीं पानें गळून पड-तात, तेव्हां पर्वतभर कापरासारखा सुगंध सुटलेला असतो. येथील हवा इंग्लंडच्या हवेसारखी आहे. किंबहुना तिच्यापेक्षांहि जास्त चांगली आहे असें तिकडील लोकांचें म्हणणें आहे. कारण इंग्लंडच्या हवेंत घटकेंत उन्ह, दुसऱ्या घटकेंत थंडी आणि तिसरींत बर्फ व हे सर्व प्रकार एका दिवसांत,

असा अनियमितपणा असतो तसा येथलि हवेंत नाहीं, त्यामुळें हें स्थळ साहेब लोकांस फारच आवडतें. इंग्लंडांत होणाऱ्या सर्व प्रकारच्या भाज्या, फळें व फुलें येथें होतात. फुलें व फळें येवढीं मोठीं पोसतात आणि फुलांचे रंग इतके भडक असतात कीं उन्ह पडलें असतां फुलांकडे पाहिले तर खरोखरीच डोळे दिपतात. उटकमंड आणि कुन्नूर येथें नळाचे पाणी आणिले आहे व सुमारें ७–८ महिन्यापूर्वी येथें विद्युत्प्रवेशाचा समारंभ ना. गव्हर्नर साहेबांच्या हातून करण्यांत आला असून आतांपर्यंत विद्युद्दीपांची व्यवस्था चोहोंकडे झाली असेल. उटकमंड हे एक मोठें शहरच आहे. येथे गोरे लोकांची वस्ती सुमारें पंधरा हजारांवर आहे. येवढी गोरे लोकांची वस्ति हिंदुस्थानांत दुसरीकडे कोठेंहि नाही. येथें नाटकगृहे, मोठाल्या हॉटेली, नाचाकरितां हॉल, सिनेमा वगैरे युरोपियनांच्या मनोरंजनाच्या, ऐषआरामाच्या आणि विलासाच्या सर्व सोयी आहेत. गव्हर्मेंट हाऊस एका उंच टेकडीवर असून त्यास लागूनच वनस्पतींचा सरकारी बाग (*Botanical Garden*) आहे. ह्या बागेची शोभा शब्दाचे आटोक्यांत येणें शक्य नाहीं. पर्वताच्या चढणीवर पायऱ्या करीत करीत त्यावर तो लावला असल्याने शेवटच्या पायरीवरून खालचा बाग एकाद्या चित्रपटाप्रमाणे दिसतो. वास्तविक म्हटले तर आगगाडींत बसून येतांना मधून मधून बंगले आणि वस्ती व मधून बागा अशी मांडणी असल्यानें आपण एकाद्या चित्रपटावरूनच सर्व प्रवास करीत आहोंत कीं काय असा भास होतो. ह्या पर्वतावर पाहण्यासारखे धबधबे आणि इतर स्थळे पुष्कळ आहेत, परंतु हीं स्थळे उटीच्या वस्तीपासून फार लांब म्हणजे २०–२५ मैल येवढ्या अंतरावर असून मोटरीचे साधन असल्याशिवाय ती पाहतां येत नाहींत. उटकमंड येथें भाजीपाला व धान्य विपुल मिळते आणि म्हणण्यासारखे ते महागहि नसते. ह्या शहराच्या शोभेंत एक कमीपणा आहे. येथलि घरें, बंगले, दुकानें वगैरे सर्वांस मजला नसतो. बहुधां अतिशय उंचीमुळे येथें वारा जोराचा असतो, आणि मजले टिकूं शकत नसतील; परंतु त्यामुळें हीं दुकानें, बंगले वगैरे ठेंगू दिसतात आणि डोळ्यांत भरत नाहींत.

उटकमंड जवळच श्री निजाम सरकार, म्हैसूर सरकार व गायकवाड सरकार वगैरे राजांचे विस्तीर्ण आणि सुंदर बाग व बंगले आहेत. निजाम

सरकाराचा बंगला त्या वेळेपावेतों पुरा झाला नव्हता व बागेवरील देख-
रेखही यथातथाच होती. म्हैसूर सरकारचा बाग फारच विस्तीर्ण असून
त्यामधील दोन टेकड्यांमधून भवानी नांवाची नदी निघते; हीस नेहमीं
महापुर येऊन तीरावरील मुलखाची पुष्कळ हानि होत असते. ही एरोड
जंकशन नांवाचे स्टेशनाजवळ कावेरीस मिळते आणि कावेरीवर येथे मोठा
रेल्वेचा पूल आहे. म्हैसूर सरकारच्या बागेची व बंगल्याची व्यवस्था चांगली
आहे आणि महाराजांची स्वारी उन्हाळ्यांत येथें राहण्यास येत असते, परंतु
ह्या सर्वांत श्रीमंत गायकवाड सरकारच्या बागेचा व बगल्याचा नंबर पहिला
लागेल. बागेचा विस्तार आटोपसरच आहे, परतु बंगला अतिशयच सुंदर आहे.
बंगल्यापुढें चित्रोद्यान ( *landscape garden* ) रेखाटलेले आहे, व उंचा-
वरून पाहिल्यास तें वनस्पतीचें आहे कीं हाताने रांगोळी काढली आहे.
असा भ्रम होतो. पावसाची वाण नसल्याने येथील दूर्वास्थली ( *lawns* )
ही गालीच्याप्रमाणे हिरवीगार आणि कापून सारखी केलेली असते. हा बाग
व बंगला पाहण्यास लोक फार येतात. बंगल्यांत अति उंची गालीचे
घातलेले आहेत व युरोपांतील प्रसिद्ध देखाव्याची चित्रे लाविलेलीं आहेत.
येथें उद्यानविहार करण्यास व वनभोजन करण्यास रविवारीं युरोपीयन
लोकांस मोकळीक ठेविली आहे. एकंदर व्यवस्था इतकी सुंदर आणि टाप-
टिपीची असते कीं जणूं कांहीं श्रीमंताचा मुक्काम प्रत्यक्ष तेथे आहे.

टिपूचें राज्य खालसा होऊन ते इंग्रजांच्या हाती आल्यानंतर सन
१८१३ सालीं नीलगिरीचा ते एक हवा खाण्याचे उत्तम डोंगरी ठिकाण
म्हणून त्यांस शोध लागला, आणि अर्ध शतकाचे अवधींतच ह्या पर्वतावर
रेल्वे वगैरे अर्वाचीन सुखाची सर्व साधने त्यांनीं केली असून त्यास
नंदनवनाची शोभा आणली आहे. ह्या शोधाचा शतसांवत्सरिक उत्सव
सन १९२३ चे वर्षी जून महिन्यांत ना. गव्हर्नर साहेबांच्या हस्ते करण्यांत
आला होता.

कृष्णेपासून कन्याकुमारी पर्यंतच्या प्रदेशांत तुंगा, भद्रा, कावेरी,
पालार, ताम्रपर्णी वगैरे पुष्कळच नद्या आहेत.
ह्या सर्व पूर्ववाहिनी आहेत. सह्याद्रींत पर्जन्य-

नद्या

वृष्टि अतिविपुल असल्यानें ह्या सदा तुडुंब भरलेल्या असतात, व त्या सपाट प्रदेशांत वहात असल्यानें बागायतास फारच उपयोगी आहेत. कावेरी ही एक सर्व हिंदुस्थानांत अत्यंत सुंदर नदी आहे. हिला दक्षिण भागीरथीच म्हणतात. हिच्याकाठीं कुंभकोण, तंजावर, श्रीरंगम् , श्रीरंगपट्टण, द्वारसमुद्र वगैरे क्षेत्रें व शहरें असून अप्पैया दीक्षित वगैरे सारखे चक्रांकित कवि "अयमेति मंदमंदं कावेरीवारिपावनः पवनः" अशा सुंदर शब्दांनीं तिचें वर्णन करण्यांत दंग झाले आहेत. थोडथोडया अंतरावर हिच्यावर धरणें बांधून किंवा इतर रीतीने तिला अडवून तिचे अनादि कालापासून कालवे व पाट काढून लक्षावधि एकर जमिनीस पाणी पाजण्यांत येत आहे. शिवसमुद्रम् नांवाचा प्रसिद्ध धबधबा ह्याच नदीवर आहे, आणि म्हैसूर सरकार ह्या धबधब्याचे साह्यानें वीज उत्पन्न करून कोलार येथील सोन्याच्या खाणींस शक्तींचा पुरवठा करीत आहे; आणि बंगलोर, म्हैसूर वगैरे शहरांत रोषनाईहि ह्याच विजेने केली आहे. कन्नंबाडी नांवाचे सर्व हिंदुस्थानांत मोठें धरण ह्याच नदीवर म्हैसूर सरकारने बांधून जो पाण्याचा संचय केला आहे तो एखाद्या सागराप्रमाणे दिसतो ह्याचें नांवही विद्यमान महाराज कृष्णराज ह्याचेपुढें 'सागर' असाच यथार्थ शब्द जोडून निर्माण केले आहे. ह्या धरणाची पूर्ण उंची १२० फूट होणार आहे, परंतु आतां पावेतों नदीचे पात्रांतलि मध्यावरील धरण मात्र ८० फूट उंच केलें आहे. मी हें धरण पहाण्यास गेलो होतों तेव्हां नदीस फार मोठा पूर आलेला असून ८० फूट उंचीवरून पाण्याचा मोठा प्रवाह कोसळत होता; तसेच धरणाच्या तळांतील दरवाजेहि उघडलेले होते आणि त्यांतून पाण्याचे लोंढे ३०-४० फूट लांबीचे एखाद्या कारंजाप्रमाणें फेकले जात होते. त्यांतून उडणाऱ्या तुषाराच्या मेघांवर सूर्यप्रकाश पडून त्या प्रत्येक लोंढ्यांतून इन्द्रधनुष्याची एकेक कमान ओळीने अधांतरी लागली होती व जणू काय कावेरीचे पवित्र तटावर देवांगनांना व देवांना स्वर्गातून उतरविण्याकरितां चित्ररंगांनीं श्रृंगारलेला आणि देवांगनांच्या कोमलपदतलस्पर्शास योग्य असा अत्यंत तलम इन्द्रधनुष्याचा पूलच बांधला आहे कीं काय असा भास होत होता. हे कन्नंबाडीचे धरण बांधण्याची कल्पना प्रथम टिपू सुलतानास आली होती आणि त्याने त्याचा पाया वगैरे बाल-

ण्यांची थोडीशी सुरुवातहि केली असावी; परंतु ही गोष्ट लोकांच्या आणि राज्याच्याहि स्मरणांतून अगदीं नाहींशी झाली होती. हल्लीचें धरण बांधण्याचें काम सुरूं होऊन आजूबाजूचे जंगल तोडून पाये खणण्याचें काम सुरूं झालें तेव्हां हल्लींच्या कोनशिलाप्रमाणे टिपूनें तयार करविलेला कोनशिलेचा दगड सांपडला. ह्यावर फारशी भाषेंत टिपूनें लेख कोरविला आहे. त्यांत ह्मटलें आहे कीं मी हें प्रचण्ड काम सुरूं केलें आहे, परंतु तें शेवटास नेणें अल्लाच्या हातीं आहे. ह्या धरणाचे पाण्यानें केल्या जाणाऱ्या बागाईतावर दराचा वाढावा केला जाणार नाहीं, असेंहि त्यांत आश्वासन देण्यांत आलें आहे. हल्लीं हा दगड म्हैसूर सरकारनें अत्यंत थोर मनानें धरणाचे पायथ्याशीं उभा केला असून टिपूचें शहाणपण व मानवी आकांक्षा आणि वैभव ह्यांच्या क्षणभंगुरत्वाची साक्ष तो जगास देत आहे. पुरणैय्या दिवाणानें कावेरी नदीचे पाणी म्हैसूर शहरांत नळ बांधून आणण्याचा प्रयत्न केला होता, परंतु तो सफल झाला नव्हता. हल्लीं ह्या धरणाचें पाणी म्हैसूर शहरांत पुरविलें जात आहे. दुसऱ्याहि अशा पुष्कळ नद्या आहेत, त्यांचें वर्णन येथें देणें शक्य नाहीं, तथापि एकीचा उल्लेख करतोंच. हिचें नांव पोन्नु किंवा होन्नु ( सुवर्णरेखा ) असे आहे व तिची करणीहि नांवाप्रमाणेंच आहे. हिची लांबी अवघी पन्नास मैल आहे, परंतु इच्या दोन्ही थडींवर आरंभापासून शेवटपर्यंत एकसारखे ओळीनें इतकें बागाईत आहे कीं ही नदी एका बागेंतील पाटाप्रमाणे दिसते.

**धबधबे**

वर कावेरी नदीवरील शिवसमुद्रम् धबधब्याचा उल्लेख केला आहे. दुसरा मोठा धबधबा प्रसिद्ध गिरसप्पाचा आहे. एका अर्थानें ह्याचे बरोबरीचा धबधबा हिंदुस्थानांत तर नाहींच, पण जगांत नाहीं म्हटलें तरी चालेल. ह्याची उंची ९६० फूट आहे. आल्प्स पर्वतामधील इव्हन्सन धबधब्याची उंची १२०० फूट आहे. व सॅव्हॉयमधील सिसरोलीची उंची २४०० फुटांइतकी प्रचण्ड आहे, परंतु ह्यांचे पाण्याचे लोंढे गिरसप्पापेक्षां लहान आहेत. उलटपक्षीं अमेरिकेंतील नायगारा नदीचे धबधब्याची रुंदी एक मैल आहे, पण उंची मात्र १६८ फूट

आहे. शरावती नदीची धबधब्याचे ठिकाणीं रुंदी २५० यार्ड असून तळच्यां डोहांतील पाण्याची खोली १३० फूट आहे. हा धबधबा म्हैसूर राज्य आणि कारवार जिल्हा ह्यांचे सरहद्दीवर आहे. म्हैसूरचे बाजूनें ह्याचा देखावा फारच उत्तम दिसतो. पडणाऱ्या पाण्याची प्रचंड गर्जना कोसोंगणती लांब ऐकूं जाते आणि ह्यावर तुषाराचे प्रचंड जाळें सदैव असून त्यांत अखंड इन्द्र-धनुष्याचा वास असतो, आणि येथील वनश्रीने इन्द्रचापांत मोतीं ओंवून त्यांचा बुरखा आपल्या मुखावर घातला आहे कीं काय असें ईश्वराच्या लीलेंचें कौतुक करण्यांत मनुष्याचे देहभान हरपतें. एका सहृदय इंग्रजी लष्करी गृहस्थानें ह्याचे संबंधानें काव्यमय वाणीनें म्हटले आहे कीं, "आपल्या दुरावलेल्या हृदयवल्लभास आलिंगन देण्यास आतुर झालेली ही शरावती १००० फूटांवरून उडी घालीत आहे."

ह्या प्रदेशाच्या पश्चिमेस प्रसिद्ध मलबार प्रांत व कोचीन आणि त्रावण-कोर हीं राज्ये आहेत. हीं राज्येहि मलबार प्रांतांतच मोडतात. ह्या प्रदेशाचें जुनें नांव मलयदेश आहे. प्रसिद्ध मलयपर्वत हा सह्य पर्वताचा एक भाग असून तोहि याच देशांत आहे. हा मलय देश आणि पर्वत याची त्रिखंड कीर्ति असून संस्कृत वाङ्मयांत हिमालयाचे भूप्रदेशाचे बरोबरीने ह्या प्रदेशाचीहि कीर्ति गाण्यांत धन्यता मानली आहे. मलयवात म्हणजे उन्हाळ्यांत वाहणारा दाक्षिणेकडील वारा ही वसंतावताराची मूर्धाभिषिक्त खूण आहे. मलबारांतील ताल तमाल—वृक्षांच्या राजी, तेथील तमालपत्रांचीं आस्तरणें म्हणजे चटया आणि त्यांनीं आच्छादित केलेल्या पानभूमी म्हणजे ताडी पिण्याचे मंडप ह्यांचें व एलालतांनीं आणि तांबूलवल्लींनीं आलिंगित चंदन व पूग वृक्षांचें फारच बहारीचें वर्णन कालिदासानें मलबार देशाच्या व तेथील राजांच्या वर्णनाच्या ओंघानें केलें असून रंगमहालांतील विलासाची सर्व सामग्री येथें आहे व परिणद्ध आलिंगित अशा श्लिष्ट शब्दांची योजना करून ह्या पर्वतांवरील सर्व जीवसृष्टि विलास—मग्न आहे असें सूचित केलें आहे. ह्यावरून कालिदासानें ह्या मलयदेशाचें प्रत्यक्ष दर्शन घेतलें असल्याशिवाय त्याचे लेखणींतून असे वर्णन निघणे शक्य नाहीं असें वाटतें.

ह्या प्रदेशांत बहुतेक सर्व धान्ये पिकतात, व त्याशिवाय चहा, कॉफी, रबर, सिंकोना वगैरे औषधि व वनस्पतींच्याहि मोठमोठ्या लागवडी येथे आहेत. इमारती लांकडांत मलबारी साग प्रसिद्ध असून वाफेच्या नावा निघण्यापूर्वी ह्या सागाची लढाऊ जहाजे येथें बांधलीं जात असून ती इंग्लंडांतील जहाजांच्या बरोबरीची होतीं व टर्कीचे सुलतानाचे आरमारास हिंदुस्थानात बांधलेल्या मलबारी सागाच्या गलबतांचा पुरवठा केला जात असल्याचे उल्लेख सांपडतात. वनस्पतींचे राज्यांत कविहृदयास प्रेमाचा पूर आणणारा चन्दनासारखा दुसरा वृक्षच नाहीं. ह्याच्या सौंदर्याच्या, सुवासाच्या व परोपकारित्वाच्या वर्णनांत प्राचीन व अर्वाचीन सर्व कवींनीं आपले चातुर्यसर्वस्व खर्च केले आहे. कालिदासाचा उल्लेख वर आला आहे; भवभूतीनेहि उत्तररामचरित्रांत सीता-विरहानें मूर्च्छित झालेल्या रामास गुप्त असलेल्या सीतेच्या करस्पर्शानें जागृति आली तेव्हां त्या करस्पर्शाच्या शीतत्वास आणि मार्दवास रामाचे मुखानें हरिचंदन पल्लवांच्या उटीची उपमा दिली आहे, व जगन्नाथराय आणि रामदास ह्यांनीं सज्जन पुरुषाचे परोपकारित्वास चंदनाची उपमा दिली आहे. ह्या चंदन वृक्षाचा मक्ता एकट्या मलय देशासच आहे व अनेक रत्नप्रभव अशा नगाधिराजाच्या कोशांतहि असले रत्न नाही म्हणून तो सर्द झालेला आहे. एका शब्दांत सांगावयाचे म्हणजे साल्यापासून तो सोन्यापर्यंत ह्या प्रदेशांत सर्व काहीं पिकते. हिंदुस्थानचे अगदी दक्षिणे-कडील टोंक म्हणजे कन्याकुमारी ते व प्रसिद्ध क्षेत्र श्री रामेश्वर ही ह्याच प्रदेशांत आहेत. रामेश्वराजवळच असलेल्या समुद्रतीरावरील धनुष्कोडी नांवाच्या तीर्थाजवळ एक फारच रमणीय देखावा आहे. पूर्व व पश्चिम अर्णवांच्या संगमाची ही जागा आहे असे मानण्यांत येते. पश्चिमेकडील समुद्रांत प्रचंड लाटा फुटत असून तो फार तुफानी दिसतो; परतु पूर्व समुद्र एखाद्या तळ्याप्रमाणें प्रशांत आणि गभीर दिसतो, आणि दोघांचे भेटीची सीमा ( लाईन ) अगदीं स्पष्ट दिसते.

**पिकें.**

हिंदुस्थान देशांत मधून मधून अनावृष्टीचे प्रसंग येत असल्यानें तलाव वगैरे कृत्रिम साधनांनीं पाण्याचा सचय करून तो शेतीस देण्याचा प्रघात फार पुरातन काळापासून

**सरोवरें.**

आहे आणि राजे व धनिक लोकांनी ह्या कामीं पैसे खर्च करण्यास मागें पाहिले नाही. हल्लीची भागीरथि नदी ही इतक्या थोड्या आणि जवळच्या मार्गानें सुमारें २२००० फुट उंचीच्या उगमावरून सपाटीवर येते किंवा भगीरथानें मुळांत हा कृत्रिम कालवा काढिला असे कित्येक इंजीनियरांचे म्हणणे आहे. धर्मराजाचें राज्य कसे चालले आहे ते पाहण्यासाठीं विचारण्यांत आलेल्या प्रश्नांत " न कृषिर्देव मातृका " म्हणजे राज्यांतील कृषि सर्वस्वी पावसावर अवलंबून नाहींना असा एक प्रश्न आहे. कृत्रिम सरोवरांपैकीं सर्वांत मोठें असे प्राचीन सरोवर म्हणजे म्हैसूर राज्यांतील सुळीकेर हे होय. कानडींत " सुळी " म्हणजे वारांगना आणि " केर " म्हणजे तळें. हे तळें एका राजकन्येने बांधविलें आहे अशी आख्यायिका आहे. त्याचा परिघ ४० मैलांचा आहे. वरील आख्यायिकेंत तथ्य असेल तर हा अत्यंत लोकोपयोगी जलाशय तिच्या पश्चातापाचें मूर्तिमंत स्मारक दिसते.

**लोकवस्ती व वर्णविभाग वगैरे.**

हिंदुस्थानांतील इतर भागांप्रमाणे ह्या भागांतहि वैदिकसंस्कृतींतील ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वगैरे चतुर्वर्ण प्रजेची वस्ति आहे. त्यांच्या संबंधाने विशेष लिहिण्याचें कारण नाहीं, परंतु इकडील मूळच्या द्राविड वंशाचे जे अवशेष आहेत, ते चित्ताकर्षक आहेत. नीलगिरींतील तोडे, बडगे वगैरे जंगली जाती आणि मैदानावर वस्ती करून राहणारे बेडर, पाईक, नायर वगैरे जाती, हे ते अवशेष होत.

**तोडे.**

ही जात आतां फक्त नीलगिरींतच आहे. हे लोक शरीरानें उंच आणि धिप्पाड व नाकीडोळीं नीटस असतात. हे सर्वच दाढ्या ठेवितात. ह्यांची वस्ति गांवापासून अंतरावर स्वतंत्र ठिकाणीं असते. ह्यांचे वस्तीस " मंड " ह्मणतात. ह्यांचीं घरें म्हणजे लहान लहान लाकडी पेट्याच होत. प्रवेशद्वार अगदीं भुईला लागून व लहान असें असतें; त्यास द्वार म्हणण्यापेक्षां बीळ हेंच नांव अधिक शोभेल. फार प्राचीनकाळीं हे लोक राज्य करीत असावे असें वाटतें. पर्वतावर त्यांची मालकी होती, पण आतां एक बोटभरहि जमीन त्यांजकडे राहिली नाहीं. इंग्रज व एतद्देशीय धनिक आणि व्यापारी ह्यांनीं ती सर्व व्यापून व लागवडीस आणून

तींत चहा, कॉफी सारख्या मूल्यवान् पदार्थांची निर्मिति केली आहे; तत्रापि बडगे वगैरे इतर जंगली जाती ह्या तोड्यांस एक प्रकारचा स्वामित्वाचा कर देतात. हे शेती किंवा मोलमजूरी करीत नाहींत. हे गुरे, म्हशी फार बाळगतात आणि त्यांच्या दूधदुभत्यांवर आपला चरितार्थ चालवितात. ह्यांच्या म्हशींची जात देशांतील इतर म्हशींहून निराळी असते. त्या उंच नसतात; पण शरिराने मजबूत असतात. ह्यांचीं शिंगें फार मोठीं आणि वांकदार असतात. हे लोक म्हशीस पूज्यहि मानतात. म्हैसूर—महिषपुर—हे नांव आणि महिषासुराची कथा यांचा या लोकांशीं सबंध दिसतो. महिषासुर हा ह्या जातीचा कोणी राजा असून त्याचा बहुधां कोणीं आर्य स्त्रीने युद्धांत पराभव करून वध केला असेल व त्यावरून तिचे नांव महिषमर्दिनी पडले असावे. हिचे दुसरे नांव चामुंडा असून म्हैसूर राजघराण्याचे तें कुलदैवत आहे. म्हैसूर शहरास लागून चामुंडी नांवाची एक टेकडी सुमारें एक हजार फूट उंचीची आहे, तिजवर ह्या देवीचे सुंदर देवालय आहे व ह्या टेकडीवरून शहराचा देखावा फारच सुंदर दिसतो. तोडा जातीच्या स्त्रियाहि सुंदर असतात. पुरुष व स्त्रिया ह्यांचे अंगावर नखशिखान्त एकच वस्त्र असतें. ह्यांच्यामध्यें बहुपतिकत्वाची चाल आहे. अलीकडे हवा खाण्यास येणाऱ्या लोकांचा सबंध आल्यामुळें हे पुरुष व बायका थोडथोडें हिंदुस्तानी समजू लागले आहेत. व कै. डोंगऱ्यांच्या इंद्रसभेच्या चालीच्या पदांसारखीं या कांहीं चांगलीं गाणीं म्हणतात; परंतु थोडेसें म्हटलें कीं लगेच बक्षीस मागूं लागतात. हिल स्टेशनवरील जंगली लोक बक्षीस मागण्यांत पटाईत असतात. माथेरानावरही ठाकोर लोकांसंबंधाने मला असा अनुभव आला होता. ही जात अगदीं ऱ्हास पावण्याचे बेतात आहे. प्राचीन शिलालेखांत व पुराण वगैरे ग्रंथांत ‘ तोंडमडलम् ’ ‘ तुंडाकराष्ट्र ’, ‘ तोंडनाडु ’ ही नांवें प्रसिद्ध आहेत. ह्यांचेपुढें लिहिली जाणारी संख्या ४८००० हजार आहे. ह्या संख्येचा अर्थ एवढी गांवे व शहरे किंवा लोकसंख्या किंवा त्यांचे उत्पन्न असा आहे. मद्रास इलाख्याचा पूर्वभाग म्हणजे हें मंडळ असें दिसतें व ह्यांत दक्षिण आर्कांट, उत्तर आर्कांटचा कांही अंश, चिंगलपट, नेलोर आणि म्हैसूरचें राज्य एवढा प्रदेश येतो, व त्याची राजधानी कांची येथे होती. हे तुंडाक राष्ट्र म्हणजे कोणत्या लोकांचे हें निश्चित झालेले दिसत

नाहीं व अशा नांवाच्या लोकांचा अवशेष सपाट मुलुखांत नाहीं. ह्या नांवास मिळते असे लोक " तोडा " हेच मात्र आहेत. हे लोक पूर्वी राज्य करीत असावे असे पूर्वी दाखविलें आहे. प्राचीनकाळीं नीलगिरीवर कोणीं स्वारी केली होती त्या वेळीं ह्या तोडे लोकांनी शौर्यानें आपला बचाव केला असेंहि एका तज्ज्ञानें मला सांगितलें; मी त्यांस विचारिलें कीं तर मग ह्या तोडे लोकांचा तुंडाक राष्ट्र ह्या नांवाशीं संबंध असावा असें तुम्ही कां मानीत नाहीं ? त्या गृहस्थानें मला उत्तर दिलें कीं तुमच्या सारख्या लोकांचें मन कोऱ्या स्लेटीप्रमाणे असल्यानें तुम्ही अशा कल्पना काढता, परंतु आमच्या मनाचें कांहीं ग्रह ठरून चुकलेले असतात आणि भरपूर पुराव्याचे अभावीं आम्हांस ते बदलतां येत नाहींत.

**बडगे.**

बडगे ह्या शब्दाचा कानडींत अर्थ " उत्तरेकडील " असा आहे व ह्या लोकांचे म्हणणे आहे कीं, मुसलमान लोकांनीं जुलूम आणि धर्मच्छल सुरू केला तेव्हां आपण उत्तरेकडून दक्षिणेस ह्या पर्वतांत येऊन वस्ति केली. ह्यांत किती तथ्य आहे तें सांगतां येत नाहीं. इतिहासांत तसा कोठें उल्लेख आढळत नाहीं. एवढें मात्र खरे की हे ह्या पर्वतांवर आपली कांहीं मालकी समजत नाहींत. ते तोडा लोकांस कर भरतात, आणि बहुधा मोलमजुरीचीं कामें करतात. नीलगिरीवर साहेब व इतर लोकांची वस्ति झाल्यापासून शेतीचा धंदा फार किफायतीचा झाला आहे, आणि आतां हे बडगे बटाटे व दुसऱ्या देशी आणि बिलायती भाज्यापाले आणि फळफळावळे पिकवितात आणि चांगल्या स्थितीत आहेत. ह्यांचीं घरेहि चांगलीं प्रशस्त झालीं आहेत. ह्यांतील कांहीं लोक खिस्ती झाले आहेत, व हे लोक शिक्षण घेत असून त्यांच्यांत कांहीं ग्रॅजुएटहि झाले आहेत असें कळते. ह्या लोकांची वस्ति सपाट प्रदेशांतहि आहे. तोडे आणि बडगे ह्या दोन्ही लोकांची भाषा कांहींशी विकृत झालेली प्राचीन कानडी आहे.

**पाईक अथवा हाळेपाईक.**

पाईक अथवा हाळेपाईक ह्या नांवाची जात म्हैसुरांत व होनावराकडे आहे, आणि विजागापट्टण जिल्ह्यांतहि आहे. होनावराकडे ह्यांस कुमार-पाईक म्हणतात.

मि. राईस ( म्हैसूर गॅझिटियरचे कर्ते ) ह्यांचें म्हणणें आहे कीं ह्या लोकांची वस्ति असलेल्या प्रदेशाकडे पाहतां रामाच्या वानर सेनेपैकीं हे असावे. पाईक म्हणजे पदाति किंवा कांहीं वाहन नसलेला लढवय्या. हाळे म्हणजे प्राचीन. कुमार म्हणजे अर्वाचीन. म्हैसूर राज्यांतील हे लोक आपणास देवरमाकळु म्हणजे देवाचे पुत्र ( पुढें रामोशी पहा ) म्हणवितात. तोडे लोकांच्या पोटजातींत पाईकी म्हणून जात आहे; ती सर्वांत श्रेष्ठ मानिली जाते व त्या लोकांत पाटलाचे जागीं किंवा उपाध्यायाचे जागीं नेमणूक ह्या पोटजातींतील माणसाची मात्र करितात.

**होळेयार.**

वरील जातीशिवाय होळेयार या नांवाची एक जात इकडील अंत्यज जातीसारखी आहे. हिचा विचार ग्रामसंस्थेविषयीं लिहितांना करूं.

**हैग अथवा हाविग ब्राह्मण.**

उच्च वर्णांपैकीं हैग किंवा हाविग नांवाच्या ब्राह्मण जातीसंबंधाने दोन शब्द लिहिण्यासारखे आहेत. हल्लीं ह्यांची वस्ति म्हैसूर राज्यांत नागरखंड नांवाच्या लहानशा प्रदेशांत असून हे तेथील जमीनदार आहेत. नागरखंडाची प्राचीन राजधानी बांडलिक किंवा बाडलीक नांवाचें हल्लीं अगदीं उद्ध्वस्त स्थितीत असलेलें एक खेडें आहे. ह्यांत फारच सुंदर नक्षी केलेले जुन्या देवळांचे पुष्कळ अवशेष आहेत. तसेंच येथें चालुक्य, कलचुर्य, राष्ट्रकूट, होयशळ, यादव आणि विजयानगर ह्या सर्व राजवंशांचे शिलालेख सांपडले आहेत. ह्यावरून ह्याचें प्राचीन महत्व ध्यानांत येण्यासारखे आहे. ह्याची जमीन-महसुलाची पद्धतीहि म्हैसूरच्या इतर भागांपेक्षां निराळी होती असें दिसतें. कदंब राजाने ह्या ब्राम्हणांस यज्ञ करण्याकरितां आणविले होते, आणि म्हणून यांचें नांव " हावीक " किंवा " हावीग " म्हणजे यज्ञविधी करणारे असे पडलें आहे असे म्हणतात. उत्तर कोकणांतील " पळशे नांवाचे ब्राम्हणहि आपणांस एका कदंब राजाने साष्टी बेटांत आणिले असे म्हणतात. गुजराथेंतील " नागर " नांवाच्या प्रसिद्ध व महत्वाच्या जातीचे जे सहा पोटभेद आहेत त्यांतील " प्रश्नोरा " नागर म्हणून एक आहे. ह्यांस

" अहिच्छात्र " असें दुसरेंहि नांव असून ते मूळचे अहिच्छात्रपुरचे असावेत. हें शहर पाञ्चाल देशांत म्हणजे हल्लींच्या रोहिलखंडांत आहे आणि त्याचें अर्वाचीन नांव रामनगर असे आहे. डॉ. फ्लीट ह्यांचें असें म्हणणें आहे कीं ' नागर ' हे ' नाग ' ह्या शब्दाचे कानडी षष्ठी विभक्तीचें रूप आहे. ' नागर ' म्हणजे ' नागांचे '. ह्या प्रदेशांत प्राचीन काळीं " नाग " लोकांचे राज्य होते, आणि नागर ह्या ब्राह्मण जातीशीं त्या नांवाचा सबंध नाही. हे द्राविक ब्राह्मण रंगाने गौरवर्ण असून त्यांचें नाक पोपटाचे नाकाप्रमाणे असते, आणि ह्यावरून मि. कॅम्पबेल साहेबांचें म्हणणे आहे की ( *Ethnography of India P. 74* ) ही शुद्ध रक्ताची जात असून हिचे मूळ उत्तरेस असले पाहिजे. नाग लोकांची वस्ति काश्मीर देशांत होती, त्यामुळे कँपबेलचें मत नाग लोकांसहि लागू शकेल; तथापि यज्ञक्रियेवरून पडलेले नांव, त्यांच्या राजधानीत असलेले उत्तम शिल्पकलायुक्त देवळांचे अवशेष आणि दक्षिण हिंदुस्थानांतील बहुतेक राजवंशांचे तेथें सांपडलेले शिलालेख ह्या गोष्टींवरून मि. राईस ह्यांचे म्हणण्यांत कांहीं तथ्य दिसते.

बेड.

कानडी अनेक वचन बेडरः—ह्या मूळच्या द्राविड जातीसंबंधाने फारसें लिहिण्यासारखें नाहीं, तथापि एवढें नमूद केले पाहिजे की, ही जात महाराष्ट्रांतील रामोश्यासारखी असून ती लढाऊ लोकांची आहे. मराठींत ' बेडर ' शब्दाचा अपभ्रंश बेरड असा झाला आहे. हैदरअल्ली व टिपू सुलतान ह्यांनीं ज्या पाळेगार लोकांची राज्ये बुडविलीं ते ह्याच जातीचे होते. ह्या सुलतानांच्या पायदळ पलटणीत बेडर लोकांचा भरणा असून शौर्यात त्यांनीं उत्तम प्रकारचें नांव कमाविले होते. शिवाप्पा नायक व तिरमल नायकांसारखे कांही प्रसिद्ध पाळेगार व राज्यकर्ते ह्यांच्यांत होऊन गेले. हल्लीं ही जात गुन्हे करणारी व दरवडेखोर म्हणून मानिली जात असून गुन्हे करणाऱ्या जातीसंबंधाचे कायदे ( *Crimiual Tribe's Acts* ) ह्यांस लागू करण्यांत आले आहेत. ह्यांच्यांत पुष्कळ पोटजाती आहेत. त्यांतून कांहींचीं नांवें हळु, नायक, पाळेगार, किरातक, जोगी वगैरे आहेत. दुसऱ्या एका

पोटजातीचे नांव जांगलिक असें आहे. संस्कृतांत विष-वैद्यास "जांगलिक" असें नांव आहे. या जांगलिकांचा धंदा औषधि वनस्पति विकण्याचा आणि वैद्यकीचा आहे. महाराष्ट्रांत आढळणारे नाकाडोळ्याचे वैदू जे "नाडी परीक्षा वैद" म्हणून ओरडत हिंडत असतात, ते ह्याच जातीचे होत. गुजराथेंतील रावळ किंवा रावळिया जातीचे लोकहि आपणांस जोगी म्हणवितात व ते मूळचे ह्या द्राविड जातीपैकी असतील; तसेच अर्जुनाशीं लढणारे किरात तेहि हेच शूर बेडर लोक असावे.

**महाराष्ट्र ब्राह्मण व मराठे.**

ह्या प्रदेशांत ऋग्वेदी देशस्थ महाराष्ट्र ब्राह्मणांची आणि मराठ्यांची वस्तीहि बरीच मोठी आहे. शिवाजी महाराजांचे वडील शहाजी, चुलता सरफोजी ( शरीफजी ) आणि सावत्र बंधू व्यंकोजी ह्या सर्वांची कारकीर्द बहुतेक इकडेच झाली होती. शहाजी राजे ह्यांनी हल्लींचे कोलार, बंगलोर, तंजावर वगैरे कांहीं म्हैसूरांतील व कांहीं इंग्रजींतील जिल्ह्यांची जहागीर मिळवून तंजावरास मराठी राज्यच स्थापन केलें होतें. शहाजी ह्यांच्या सैन्यांत साहजिकपणेंच लढवय्या मराठे शिलेदार, बारगिरांची भरती पुष्कळ होती; शिवाय टिपू सुलतान आपल्या राज्याचे हिशेब उर्दू, कानडी व मराठी या तीन भाषांत ठेववीत असे. मराठी कुळकर्णी हिशेबी कामांत हुशार म्हणून त्यांस मुद्दाम आणवून त्यानें हिशेबाचे कामाकडे लाविले होते. या सर्व कारणांनी या प्रदेशांत महाराष्ट्र ब्राह्मणांची आणि मराठ्याची बरीच मोठी वस्ती झाली. तंजावरांतील ह्या घराण्यांतील मुत्सद्दीगिरी वगैरेचे गुण अद्यापहि जिवंत असून अलीकडील संस्थानांतील कांही नामांकित दिवाण ह्याच घराण्यांतले होते. उदाहरणार्थ राजे सर टी. माधवराव व त्यांचे चिरंजीव आनंदराव ( म्हैसूरचे माजी दिवाण ), दुसरे त्याच संस्थानचे माजि दिवाण कृष्णमूर्ति, इंदोरचे माजि दिवाण आर्. रघुनाथराव, बडोदें, त्रावणकोर व म्हैसूरचे माजी दिवाण व्ही. पी. माधवराव इ. इंग्रजांचे राज्य झाल्यानंतर एतद्देशीयांची तलवार म्यानांत गेली, ह्यामुळे कोणी शिपाई नांवारुपास येऊं शकले नाहींत.

**लमाण.**

। ह्यांस कानडींत लम्बाडी किंवा लम्बाणी, हिंदींत वणजारा ( संस्कृत वनेचरः ) आणि मराठींत वणजारी असें ह्मणतात. हे बैलांचे मोठमोठे थवे बाळगीत असत, आणि

त्यांच्या पाठीवरून एका देशांतून दुसऱ्या देशांत धान्य, मीठ वगैरेची ने-आण करीत असत. ह्यांच्या घरांच्या जथ्याला " थांडा " असें कानडींत नांव आहे. मराठीत त्याचा तांडा असा अपभ्रंश झाला आहे. मराठींत त्याचा अर्थ लमाण व त्यांचे बैल याचा समूह. ह्यांच्या भाषेचे नांव " कुटणी " असे आहे, आणि ती मराठी, कानडी, हिंदी वगैरे भाषांच्या एकत्र कुटण्यानें-मिश्रणाने झाली आहे. ह्यांचे आचार-विचार अगदी निराळ्या तऱ्हेचे असून प्राण वेचूनहि ते गुप्त ठेवण्यांत येतात. ह्यांच्या पुरोहिताच्या हातीं मारण्या-तारण्यापर्यंतचे सर्व अधिकार असतात. ह्यांच्यांत बालहत्या, मनुष्यास बळी देणे, भूते-खेतें आणि चेटूके करण्याची चाल आहे. एकमेकांस ओळखण्याच्या ह्यांच्या कांहीं खुणा असतात. यांच्या पोटविभागांचीं नांवे वागरी ( मिरासिकत किंवा परडी ) जोगी किंवा जोगडा, भिमडा वगैरे आहेत. जंगली पांखरे धरण्याचा उद्योग वागरी करितात. ( संस्कृतांत वागुरा ह्मणजे फांसा ) गुजराथेत ही वागऱ्यांची जात असून आजमितीसाहि ते पक्षी धरण्याचा धंदा किंवा बैलांचा व्यापार करितात. जोगी भिक्षा मागतात, भिमडे हे भटकणारे लमाण होत. ह्या लमाणांत महारासारखीहि एक जात आहे, त्यांस ढाळिया ह्मणतात. ते कार्यप्रसंगी नगारे वाजविण्याचा धंदा करितात. लमाणाच्या वस्तीपासून ह्यांची वस्ति दूर अंतरावर असते. गोसावी लोकांस हे आपले गुरु मानितात, व कृष्ण आणि बसव ह्यांस आपलीं दैवते समजतात. श्रीकृष्ण हे गवळी व बसव म्हणजे नंदी; गाई व बैल हे श्रीकृष्णाचे प्रिय पशु, म्हणून बसव व कृष्ण हीं त्यांचीं दैवतें झाली असावी.

**ग्रामसंस्था.**

ही एक सर्व हिंदुस्थानांत अत्यंत महत्वाची प्राचीन संस्था असून ती आर्य संस्था दिसते; तथापि मूळच्या द्राविड रहिवाशांतहि अशा प्रकारची ग्रामसंस्था असावी. या संस्थेतील कांहीं शब्द संस्कृतावरून निघाले आहेत, तर कांहीं शुद्ध द्राविड आहेत. गांव म्हणजे अमुक इतक्या जमिनीची लागवड करणारी किंवा अमुक इतका महसूल देणारी वस्ति असा प्राचीन अर्थ दिसतो; परंतु पुढें, एके ठिकाणीं आणि एका जथ्यांत राहणारी वस्ति असा अर्थ झाला. कारण गांव शब्दांत शेती न करणाऱ्या लोकांचा म्हणजे पांढरपेशांचाहि समा-

वेश होऊं लागला. शिवाय वस्तीत रहाणाऱ्या लोकांच्या गरजा भागविणाऱ्या कारागिरांची प्रत्येक वस्तीस जोड असून त्यांचाहि समावेश गांव या शब्दांत होऊं लागला. राज्यघटनेच्या दृष्टीने ग्राम ह्मणजे सर्वांत लहान असा एकत्र वस्तीचा आद्य भू–भाग होय. ( Unit ) गांवामध्यें साधारणतः दोन प्रकारची वस्ति असे. ( १ ) कृषिकार ( २ ) इतर. ह्या दुसऱ्या प्रकारामध्यें वाणी, उदमी आणि कर न देणाऱ्या सरकारी नौकर वगैरेचा व कांहीं बलुतेदार ग्रामसेवकांचा समावेश होत असे. गांवचा मुख्य ( किंवा राजा म्हटलें तरी चालेल ) पाटील ( *Sanskrit*–पट्टकील ) होय. कानडींत ह्यास " गौडा " असा शब्द आहे. पुष्कळ गांवच्या जथ्याच्या पाटलास " नाडगौडा किंवा नाडप्रभू " अशी संज्ञा आहे. ह्या पाटलांस पूर्वी सरकारांत मोठा मान असून मोठमोठीं इनामेहि असत. ह्यांचे वाडे तटबंदी असून त्यांचे भोवतीं खंदक असत, व त्यांत 'शस्त्रास्त्रा' चा मारा करण्याच्या जागा आणि मोर्चे असत. गुजराथेत पाटलाचे घरास कोठे तटबंदी आढळत नाहीं, परंतु काठेवाडांत कांहीं ठिकाणी अशी तटबंदी माझे पाहण्यांत आहे. दक्षिणेंतहि जुन्या व महत्वाच्या गांवांस पूर्वी तटबंदी असे, व अद्यापहि अशा तटबंदीचे अवशेष दिसतात. ह्या पाटलांस गांवलोकांकडून लग्नप्रसंगीं नजराणा मिळे. गुजराथेंत ह्या करास चांदलापट्टी म्हणतात. पुढें हा कर सरकार घेऊं लागले, आणि जमीनमहसुलाची रयतवारी पद्धत झाल्यावर ती काढून टाकण्यांत आली आहे. या शिवाय सार्वजनिक उत्सवाचे वेळीं पाटलास पानसुपारी, नारळ वगैरे बहुमान अग्रपूजेदाखल मिळतो. ह्या बाबींशिवाय गांवांतून पाटलास कांहीं मिळकत नसे व पाटिलकी म्हणजे प्रत्यक्ष किफायतीची बाब नसून ती मानाची व अधिकाराची जागा होती. पाटलाचे हाताखालीं गांवचे हिशेब वगैरे ठेवण्यास कुळकर्णी असे. संस्कृतांत करणम् किंवा श्रीकरणम् म्हणजे हिशेब, कानडींत कुळकर्ण्यास शामभोग म्हणतात. त्याचा अपभ्रंश शेनबोवा, व तो शेणवी ह्या शब्दाचे अगदीं जवळ आहे. जुन्या शिलालेखांत प्रभु व शेनबोवा हे शब्द वारंवार येतात, त्याचा विचार तूर्त करीत नाहीं. वसुलाचें, न्यायाचें आणि ग्रामरक्षणाचे काम पाटलांकडे असून त्याबद्दलची जबाबदारीहि त्यांजवर असे.

कामधंद्याच्या दृष्टीने गांवाचे दोन विभाग करण्यांत येत असत. कानडींत धंद्यास " पण " म्हणतात (*English-Guild*) ह्या पणाचे उजवे आणि डावे असे दोन विभाग

**बाळगाई आणि अळगाई**

असत. उजवीकडचे धंदेदार पुरातनचे असून डावीकडचे नवीन दिसतात. कानडीत ह्यांस अनुक्रमे " बाळगाई आणि अळगाई " अशीं नांवे आहेत. मराठीतील बलुते आणि अलुते हे शब्द ह्यांचेच अपभ्रंश दिसतात: बाळगाईच्या समूहामध्यें अठरा धंद्यांचा समावेश होतो. मराठींतील "अठरा-पगड-जात " ही म्हण ह्यावरून निघाली असावी. अळगाई म्हणजे डावीकडील समूह, ह्यांत तेरा धंद्यांचा समावेश होतो. गुजराथेंत " तेर तासळी " असा शब्द आहे व त्याचा अर्थ तेरा बलुतेदार. ( तासळी म्हणजे मोठी वाटी—वाडगा ) असा आहे. उजव्या समूहाचा मुख्य वाणी ( का. बणजीग ) होय. डाव्या समूहाचे मुख्य पाञ्चाल म्हणजे पांच प्रकारच्या धंदेवाल्यांचा समूह आहे. ह्यात सुतार, कांसार, ( का. कचुगार गुजराथी कणसारा ) लोहार, सलाट आणि सोनार ह्यांचा समावेश होतो. गुजराथेत सुतार, सोनार वगैरे जातीचे लोक आपल्या नांवापूर्वी पञ्चोळी किंवा पचाळ हा शब्द अद्याप लावितात. उजवीकडील धदेवाईकाचे यादीत शेवटचे नांव " होळेय " यांचे आहे. कानडींत ह्या शब्दाचे अनेकवचन होळेयार ( माडिग ) असे आहे. हे दक्षिणेतील मांग किंवा महार ह्या जातीसारखे असतात. हा कनिष्ठ वर्णाचा परतु फार महत्वाचा आणि अतिशय उपयुक्त असा गांवचा घटक आहे. इकडे नवरात्रात रेडा बळी देण्याची चाल आहे. दक्षिणेतहि ही चाल असे. हा बळी देताना पुरोहिताचे काम मुख्यत्वेकरून ह्याच जातीकडे असे. हा बळी महामारी सारख्या सहारकारक दैवताची प्रसन्नता मिळविण्याकरितां असतो, आणि अशा दैवतांचे पौरोहित्य ह्याच वर्णाकडे असते; ह्या प्रदेशांत नवीन गांवाची वस्ति करताना प्रथम ह्या माहामारी देवीचे देऊळ बाधून तिची स्थापना करितात. दक्षिणेतहि गांवाबाहेर " महामारी, जरी मरी, सटवाई, बहिरोबा अगासारख्या अनार्य देवतांचीं स्थाने बहुधां सर्व गावांत असतात, आणि गांवच्या प्रवेशद्वारापाशीं म्हणजे वेशीपाशीं महामारीचे देवालय आणि चावडी ही असतात. वर्षांतून एकदां ह्या महामारीचे

देवळाजवळून गांवांतील सर्व गुरे हांकित नेण्याचा प्रघात आहे. दक्षिणेत "होलार" म्हणून मांगांची एक जात आहे. ह्यांचा धंदा शुभ व अशुभ प्रसंगी वाजंत्री वाजविण्याचा आहे. वर लिहिलेले "होलेयार" तेच हे "होलार" होत असे वाटते. डावीकडील समूहांतील शेवटचा धंदेवाईक "माडीग" हा आहे. हा दक्षिणेतील महारासारखा आहे. दक्षिण हिंदुस्थानांत पाटबंधाऱ्यांची फार उत्तम व्यवस्था पुरातन काळापासून केलेली असल्यानें तिकडील ग्रामसंस्थेंत जलाशय खोदणे, ते दुरुस्त ठेवणे आणि पाण्याची वांटणी निःपक्षपाताने करणे वगैरे गोष्टींची व्यवस्था लावणे अगदी आवश्यक होते, आणि हे सर्व धंदे करणारांचा समावेश ह्या "बाळगाई" "अळगाई" समूहांत केला असून त्यांतील कांहींस बलुत्यांतहि दाखल केले आहे. "माडीग" हा अशा बलुतेदारांपैकीं होय. जलाशयांतील पाणी बागायताकरितां वाटण्याचे काम ह्या माडीगाचें असे, आणि हे काम करणारास "नीरगंठी" म्हणतात.

माहितीकरिता बाळगाई आणि अळगाई ह्यांची यादी त्यांच्या मराठी नांवासुद्धां खालीं देण्यांत येत आहे.

**बाळगाई.**

| कानडीं नांव. | मराठी नांव. | कानडीं नांव. | मराठीं नांव. |
|---|---|---|---|
| १ बणजींग | १ वाणी | ११ आगास | ११ परीट |
| २ वक्कलीग | २ शेतकरी | १२ बासटा | १२ पालखी वाहणारा भोई |
| ३ गाणिग | ३ तेली | १३ पद्मसाळीं | १३ साळी |
| ४ रंगारे | ४ रगारी | १४ नाईद | १४ न्हावी |
| ५ लाड | ५ मराठी व्यापारी | १५ उप्पार | १५ मीठ पिकविणारा |
| ६ गुज्जर | ६ गुजराथी व्यापारी | १६ चित्रगार | १६ चित्रकार |
| ७ कामाठी | ७ मजूरी करणारे | १७ गोळ्ळ | १७ गवळी |
| ८ जैन | ८ जैन | १८ होलेय | १८ मांग, होलार (अनेक वचन होलेयार) |
| ९ कुरुब | ९ मेंढपाळ, धनगर | | |
| १० कुंभार | १० कुंभार | | |

## अळगाई.

| कानडी नाव. | मराठी नांव. | कानडी नांव. | मराठी नांव. |
|---|---|---|---|
| पाञ्चाळ. | | ८ हेग्गणिग | ८ दोन बैलांचा घाणेवाला तेली |
| १ बडगी | १ सुतार | ९ गोल्ळ किंवा धनपाळ | ९ धनगर किंवा गवळी |
| २ कञ्चुगर | २ कांसार | १० बेड | १० शिकार वगैरे करणारे हिंसक |
| ३ कम्मार | ३ लोहार | ११ याकुळ | ११ कृषीकार |
| ४ काल्ळकुटीग | ४ सलाट | १२ पल्ली किंवा तिगळ | १२ काच्छी |
| ५ आखसाले | ५ सोनार | १३ माडिग | १३ महार |
| ६ भेरी | ६ एक जातीचे व्यापारी | | |
| ७ देवांगसाळी | ७ साळी | | |

ह्या यादींत दोन्ही बाजूस सामान्य असे कांही धंदे आहेत. उः–तेली. कानडींत गाणा म्हणजे तेल्याचा घाणा. हा मराठी शब्द कानडी शब्दाचा अपभ्रंश दिसतो. वरील यादींतील लाड म्हणजे मराठी व्यापारी आणि गोल्ळ उर्फ धनपाळ ह्याचे संबंधानें दोन शब्द लिहिण्यासारखे आहेत. लाड हे मूळचे लाट देशांतील रहिवासी होत. हा देश एक वेळ फार प्रसिद्ध होता असे दिसते, परंतु आजमितिस ह्याचा गुजराथ ह्या सामान्य शब्दांत अन्तर्भाव झाला आहे. हा देश म्हणजे नर्मदा व कीम ह्या नद्यामधील प्रदेश होय. इंग्रजी सुरत जिल्हा आणि गायकवाडाचा नवसारी जिल्हा हे ह्या प्रदेशांत मोडत असत. नवसारी हे फार प्राचीन शहर आहे. राष्ट्रकूट राजांचे शिला-लेख येथे आहेत. हें शहर लाट देशाची राजधानी होती. खानदेशांत लाडांची वस्ति पुष्कळ असून ते सर्व व्यापार करीत असल्यानें लाड ह्या शब्दाचा व्यापारी असा सामान्य अर्थ झाल्याचें दिसते. खानदेशांतून ह्या लोकांची वस्ती दक्षिण हिंदुस्थानांत पसरली असावी आणि म्हणून ह्यांस

त्या प्रदेशांत मराठी वाणी म्हणत असले पाहिजेत. लाट देशांत ग्रंथकार व कवीहि झाले असले पाहिजेत वैदर्भी गौडी वगैरे संस्कृत काव्यलेखनाचे जे प्रकार ( *Styles* ) आहेत त्यांत ' लाटी ' हाहि एक प्रकार असून तो लाट देशस्थ ग्रंथकारांचा विशेष असला पाहिजे. लाटानुप्रास म्हणून प्रासांचा एक प्रकार आहे. त्याचा संबंधहि ह्याच देशाशीं दिसतो. सुरत जिल्ह्यांतील ओलपाड, बलसाड, अमलसाड वगैरे गांवाचे नांवांत ह्या लाट शब्दांचा अवशेष दिसतो. धनपाळ हे पूर्वी कदाचित् सरकारी खजिन्याची ने आण करीत असतील; कारण ही जात शूर असून जंगल वगैरेतील रस्त्यांची माहितगार असावयाची. तेवढ्यामुळे ह्या जातीस धनपाळ असें नांव पडले असावे असे गॅझिटिअरकारांचें ह्मणणें आहे. मनुष्यप्राण्याची केवळ रानटी स्थितींतून उत्क्रांति झाल्यावर तो पदरीं गुरे ढोरे बाळगून चरितार्थ करूं लागला. ह्या अवस्थेस इंग्रजींत ( *Pastoral Age* ) किंवा धनपाल युग असें म्हणतात, आणि भारत वगैरे प्राचीन ग्रंथांत " धन " हा गाई-बैलांचे संपत्तीस लाविलेला शब्द आहे. " गोधन हरावयास्तव. ... ......... " ही मोरोपंती आर्या प्रसिद्ध असून पूर्वी प्रतिस्पर्धी राजे एकमेकांची गुरांचीं खिल्लारे हांकून नेत असत. भारतांतील " गोग्रहण " प्रसिद्ध आहे. आजमितीसहि गुरें-ढोरे घेऊन त्यांस चारण्यासाठी इकडे तिकडे फिरणाऱ्या कांहीं जाती आहेत. उदा:- " बद्दी " वगैरे भटकणारे अरब, काठेवाडांतील जंगलांत रबारी, भरवाड, चारण वगैरे असेच लोक आहेत. काठी व बाबरिये लोकहि मूळ हाच धंदा करीत होते. रबारी हा शब्द कानडी कुरुबार ह्या शब्दापासून झालेला दिसतो. काठेवाडांत गाईचे टोळीस आजमितीसहि धन ह्मणतात. मराठींतील " धनगर " हा शब्द ह्याच धंद्याचा वाचक आहे, आणि " धनपाळ " ह्या शब्दाचा सरकारी कोश किंवा धनाशीं संबंध नसून गाई राखणारा, असा त्याचा अर्थ आहे. प्रसिद्ध इराणी धर्मसंस्थापक किंवा सुधारक झरतुष्ट्र होता असें मानितात, ह्या शब्दाचा अर्थ " हजार उंट बाळगणारा " ( सहस्र उष्ट्र ) असा असावा असें वाटते.

वर सांगितलेल्या बाळगाई आणि अळगाई ह्या दोन समूहांत मानपानाचे बाबतीवरून फारच स्पर्धा असे, परंतु आतां ती दिवसेंदिवस कमी होत आहे. उजवीकडील समूह लग्नमंडपास बारा खांब लावण्याचा आपला अधिकार आहे असे मानतो. अळगाईस अकरा खांब लावण्याचा अधिकार आहे. शिवाय बाळगाई आपली मिरवणूक घोड्यावर बसून काढण्याचा आणि मिरवणुकींत हनुमान चिन्हांकित ध्वज फिरविण्याचाहि आपला स्वतंत्र हक्क मानतात. मुंबईत पांचकळशे, सातकळशे अशा नांवाच्या जाती आहेत. लग्नमंडपांत कलशांची अमुक संख्या लावण्याच्या हक्कावरून हीं नांवें पडलीं आहेत. मराठी आणि कानडी अशा या दोन रिवाजांतील साम्य लक्ष्यांत घेण्यासारखें आहे.

हनुमान ध्वज.

ख्रिस्ती शकाच्या पूर्वी दोन तीन शतकांपासून तों इसवी सनाच्या सहाव्या शतकापर्यंत " कदंब " वंशांतील राजे गोंवा, पळशी वगैरे ठिकाणीं राज्य करीत होते. ह्या राजवंशाचा प्रधानदेव " हनुमान " होता. अर्जुनाचा ध्वजांकहि हनुमानच होता. मि. राईस ह्मणतो कीं, ह्या कपिध्वज मिरविण्याचा प्रचार ह्या प्रदेशांत फार असून श्री रामचन्द्राचे सेनेस " वानरसेना " असें नांव त्यांच्या कपिध्वजावरून पडलें असावें. सिंहलद्वीपांत सांपडलेल्या रामायणांत रामाचे सैन्यास " कपिध्वज सैन्य " असे ह्मटले आहे. हल्ली उपलब्ध असलेल्या रामायणांत ह्या वानरसेनेचें जें पशुरूपानें वर्णन आहे तें लिहिणाऱ्या कवीस ही गोष्ट माहीत नसावी, अथवा हें वर्णन रामायणांत मागून घातलेलें असावें. अशा प्रकारचे दुसरे उदाहरण जनमेजयाच्या सर्पसत्राचें होय. अति प्राचीनकाळीं " नाग " जातीच्या लोकांचे राज्य काश्मीरपासून कन्याकुमारिकेपर्यंत होते. ह्या लोकांच्या " तक्षक " नांवाच्या राजानें परिक्षितीस मारिलें, त्याचा सूड उगविण्या-करितां त्याचा पुत्र जनमेजय ह्यानें सर्पांचा ( हें नागांचें दुसरें नांव ) मोठा संहार केला. ह्या संहारास यज्ञांतील पशुसंहाराची उपमा देऊन सत्र असें ह्मटलें आहे; परंतु कवीनें आपली कल्पना भरधांव सोडून

ह्या सत्रास खरोखरीचा यज्ञ ठरविला, व यज्ञांतील आहुती " इंद्राय तक्षकाय स्वाहा............ " वगैरे सर्वांचें यथास्थित वर्णन केलें आहे. बळीस पाताळांत काढणें वगैरे दुसरीं अशा प्रकारचीं पुष्कळ उदाहरणें देतां येतील.

गांवांतील वस्तीच्या सुखसोयीकरितां आणि बंदोबस्ताकरितां गांवाच्या कह्यांत वागून व गांवावरच उपजीविका करून राहणाऱ्या ग्रामसेवकांची प्रत्येक गांवास गरज असणारच. ग्रामसंस्थेंत ह्या सेवकांची फारच चांगली व्यवस्था केली आहे. ह्या ग्रामसेवकांची संस्था बहुधा बारा असते; त्यांचे माहितीकरितां खालीं यादी दिली आहे. ही संख्या पंधरा बलुत्यांची आहे. गांव लहान मोठा असेल त्या प्रमाणें ती कमजास्ती असते.

१ वर सांगितलेले पाञ्चाळ यांसच संस्कृतांत पञ्चकारुकी ह्मणतात.
२ न्हावी. ३ शिंपी ( कानडी चिप्पीग आणि गुजराथी छिपा )
४ साळी. ५ परीट. ६ गवळी. ७ कुरुबार.
८ तेली. ९ कुंभार. १० मीठ पिकविणारे. ( उप्पार )
११ सोन्याच्या किनारी, जरीचे कांठ वगैरे करणारे. ( कानडी—सारीग )
१२ कहार किंवा मच्छीमार. १३ ताडी काढणारे. ( इडिग )
१४ गांवचे रखवाल. १५ माडिग म्हणजे मोची, चांभार वगैरे.

पञ्चकारुकांचें आधिपत्य सोनार ह्या जातीकडे आहे. ह्या पांची जाति आपण वर्णानें ब्राह्मण आहों असें ह्मणतात व यज्ञोपवीत धारण करितात. विश्वकर्म्याच्या पांच पुत्रांपासून ह्या पांचांची उत्पत्ति झाली आहे असें ते म्हणतात.

कुरुबार ह्या जातीचे अनेक पोटविभाग आहेत, आणि त्यांचीं नांवें हल्लीं मराठे लोकांत सांपडणाऱ्या कांहीं आडनांवांसारखीं आहेत. होळकर हें अशापैकीं एक नांव आहे. कानडींत दूध व त्यापासून निघणारें तूप ह्यांच्या धंद्यास " हलु " असें नांव आहे, व तो धंदा करणारा तो " हलुकर " ( होळकर ) धनगर हें नांवहि त्याच अर्थाचें आहे. होळ गांवचे " होळकर " अशी ह्या नांवाची उत्पत्ति लाविली आहे;

परंतु "हलु" चा धंदा करणारे ज्या गांवांत राहातात. त्यांचें नांव "होळ" असें पडलें असावे. कानडींत "गोळ" म्हणजे गवळी किंवा धनगर. पुणें जिल्ह्यांत "खेड" ह्या नांवाचें एक प्रसिद्ध गांव भीमातिरीं आहे, व तें तालुक्याचेंहि ठिकाण आहे; त्याचें जवळ "गोलापूर" नांवाचें खेडें आहे, त्यांत एकजात धनगरांची बस्ति आहे.

कृषिकार धान्य तयार करून ते घरीं नेण्यापूर्वी बारा महिने राबून आपलीं कामे करणाऱ्या बलुत्यांस त्या धान्यांतून मूठपसा धान्य देतो, व त्यांवर ह्या बलुतेदारांची उपजीविका असते; शिवाय पांढरपेशांचे चाकरीबद्दल त्या लोकांकडून ह्यांस पोटगीबद्दल कांहीं मिळतें, परंतु ते खळ्यावरील धान्याप्रमाणें ठराविक आणि बांधलेलें नसतें. कांहीं प्रकारच्या नौकरीकरितां जमीन धाऱ्याची पुरी किंवा अंशतः माफी ह्यांस दिलेली असते. दशवंद नांवाचा एक जमिनीचा सत्ता प्रकार आहे, अशी जमीन धारण करणाऱ्यापासून त्या जमिनीवरील पूर्ण धाऱ्याचा $\frac{9}{10}$ भाग घेऊन $\frac{1}{10}$ भाग धारण करणारास माफ केलेला असतो. गांवांतील व शिवेंतील तळीं नेहमीं दुरुस्त स्थितींत ठेवणें हें ह्या दशवंद धारण करणाऱ्यांचें काम असे. बलुत्यांमध्यें महारास धान्याचा हिस्सा सर्वांत मोठा मिळतो. दक्षिणेंत व वऱ्हाडांत या महार बलुत्याबद्दल गवगवा झाला होता, कारण त्याचा बोजा फारच वाढला होता. होलार आणि महार ह्यांत अनेक पोटजाति आहेत. त्यांचीं चव्हाण, परेय (*Pariah*) भूमी वगैरे नांवें आहेत. गुजराथेंत महारांस "भांबी" म्हणतात व त्यांच्या कांतडे रंगविण्याच्या धंद्यावर घेतल्या जाणाऱ्या करास "भांब" किंवा "भांबवेरो" म्हणतात. हे भूमी या शब्दाचे अपभ्रंश दिसतात. गुजराथेतल्या प्रमाणेच कर्नाटकांत "मतादार" होते. एका ताम्रपटांत (नंबर २९ *Epigraphica Karnatika*) तो मतादार चोटीदेव यानें लिहिला असा उल्लेख आहे. कानडींत बलुत्याच्या हक्कास "आयम्" आणि बलुतेदारास "आयंगडी" म्हणतात. प्राचीन गुजराथेंत बलुतेदारास "आयतेदार" असें नांव आहे. भाट, चारण वगैरे याचकवर्गास "गदई" असे नांव आहे. ह्याचा कानडी "गडी" शीं संबंध दिसतो.

प्रत्येक वस्तीवाल्या गांवाची सरहद्द बरोबर मुक्रर केली असून गांवचें गुरचरण वेगळे पाडलेलें असे. गांवच्या सरहद्दीवर बांधवरोळया केलेल्या असत. गुरचरणासंबधानें फार काळजी घेतलेली असे. इतिहासकार वुईल्क्स ( Wilks ) म्हणतो की एखाद्या बलवान् राजाच्या सरहद्दीची एवढी काळजी घेतली जात नसेल.

इंग्रजी राज्य होण्याचें पूर्वी मुसलमानांचें अमदानींत राजा "तोडरमल" नामक अकबर बादशाहाचा प्रधान आणि मलिकंबर अहमदनगरच्या निजामशाहीचा प्रधान ह्यांनीं जमिनीची मापणी व प्रत करून दर ठरविल्याचे प्रसिद्ध आहे. पेशवाईत सदाशिवरावभाऊ पेशव्यांनीहि अशीच पाहणी करून दर ठरविले होते. तोडरमल्लाचे दर वगैरेंचे कागद अद्याप गुजराथेंत कोठें कोठे सांपडतात. दक्षिण हिंदुस्थानांत अति प्राचीनकाळीं अठराशें वर्षांपूर्वी कदंब राजांचे अमदानींत राजा कदंबराय व त्याचे प्रधान गोपमंत्री आणि नागदेव कर्णिक ह्यांनीं जमिनीची मापणी. प्रत ( बीजवारी ) आणि सरकार हक्काची मुक्रता केल्याचा इतिहास थोडाबहुत सांपडतो, तो विस्तारपूर्वक येथें देतां येत नाहीं. त्यानंतर बेदनूरचा पाळेगार राजा शिवाप्पा नायक ह्यानेंहि अशीच धारेबंदी केली होती, ही तिकडे सुप्रसिद्ध आहे; हा पाळेगार इ. स. १६४८ पासून १६७० पर्यंत राज्य करीत होता, ह्यानेंच शृंगेरी मठाची नित्याची पूजाअर्चा आणि तत्प्रीत्यर्थ लागणारा खर्च याचे नियम बांधून दिले आहेत. शिवाप्पाच्या धाराबंदीस " शिस्त " म्हणतात, हीत जमिनीचे पांच वर्ग केले आहेत. ( १ ) उत्तम. ( २ ) मध्यम. ( ३ ) कनिष्ठ. ( ४ ) अधम. ( ५ ) अधमाधम. प्रत्येक गांवांत ह्या प्रत्येक वर्गाचे एकेक शेत घेऊन बारा वर्षेपर्यंत त्याची लावणी करवून उत्पन्नाचे हिशेब त्यानें ठेवविले व त्या हिशेबाची सरासरी करून जमिनीचे दर ठरविले. हल्लीं जमिनीचा कनिष्ठ भाग किंवा एकम् म्हणजे बिघा किंवा एकर मानितात, त्याप्रमाणें पन्नास शेर बीं लावण्यास पुरेल इतकी जमीन म्हणजे " एकम् " असें शिवाप्पानें धरलें होते. गुजराथेंत अमुक बीं लागणारी जमीन हें एक वेळ माप असावें असें दिसते.

जुन्या मंत्र्यांच्या किंवा प्रधानांच्या नांवांत न्यायाधीश किंवा तशा अर्थाचा शब्द सांपडतो, तथापि हल्लींप्रमाणे सर्व देशभर न्याय देणाऱ्या कचेऱ्या होत्या असे दिसत नाहीं. क्षुल्लक वादांचे पाटीलच समजूत घालून निवाडे करी, किंवा लोक आपआपले पंच नेमून निकाल करून घेत. हीन वर्णांच्या लोकांसाठीं सरकार पंचांची किंवा सरपंचांची नेमणूक करी. दिव्येंहि करण्यांत येत असत. म्हैसूरांत इ. स. १६७७ सालांतील एका शिलालेखांत अशा दिव्याचा उल्लेख आहे. एका मनुष्यावर फितूर केल्याचा आरोप होता, त्यानें कढईत तापलेल्या तुपांत हात घालून आपला निर्दोषपणा शाबीत केला. हे निवाडे करण्याबद्दल वरील अमलदारास पक्षकाराकडून कांहीं शुल्क म्हणजे फी मिळत असे. गुजराथी शब्द सुकडी हा ह्या "शुल्क" शब्दाचाच अपभ्रंश दिसतो. कानडींत शुल्कास सुंक म्हणतात.

**न्याय.**

जमिनीवर धारा असे त्याप्रमाणें गांवांतील सर्व धंदेकऱ्यांवर कर असत. कृषीकारांचा मुख्य आणि कैवारी जसा पाटील तसाच धंदेगारांचा मुख्य 'पेठशेटी' किंवा 'नगरशेटी' असे. घरांवरहि कर असे. कृषीकारांस व धंदेवाईकांस वेठ करावी लागत असे, तिला कानडींत 'विट्टी' असे नांव आहे. संस्कृत विष्टी शब्दावरून हे शब्द निघाले असावे.

**इतर कर.**

'राज्य' ह्या शब्दाची सोपी व्याख्या म्हणजे एका राजाच्या किंवा राजसंस्थेच्या अमलाखालील मुलुख. राज्य सुयंत्र चालविण्याकरितां अशा राज्याचे विभाग पाडून शासनाचीं निरनिराळी कामे करण्याकरितां वेगवेगळे अधिकारी नेमावे लागतात. अर्वाचीन संस्कृतांत 'विषय' ह्या शब्दाचा अर्थ सामान्यतः जरी देश असा होतो, तथापि ह्या प्रदेशांत पूर्वी ह्या शब्दाचा अर्थ राज्याचा एक भाग असा होता. उदाहरणार्थ सेद्रक विषय, त्याचप्रमाणे 'नाड' किंवा 'नाडु' या शब्दाचा अर्थहि हल्ली कानडींत देश असा

**राज्यघटना आणि शासन.**

दिसतो; तथापि हाहि पारिभाषिक शब्द असून एके वेळीं ह्याचा अर्थ राज्याचा भाग असा होता. जसे कोंगनाड, माळनाड, तमीळनाडू वगैरे. ह्या मोठ्या विभागांचे पोटविभाग खोबळ, परगडा वगैरे असत. हल्लीं जमीनमहसुलाच्या कामाचे आणि न्यायाच्या कामाचे विभाग एकच असतात असें नाहीं; त्याचप्रमाणें पूर्वीहि दोन प्रकारचे विभाग असत असें दिसते. उ:-शंभर निष्कांचे उत्पन्न होईल एवढ्या भूप्रदेशास 'शीम' किंवा 'क्षेत्र' असें नांव असे. अठरा हजार क्षेत्रें ह्मणजे एक 'खंपण' २ खंपण ह्मणजे एक 'वंठ्य' वगैरे. गुजराथेंत प्रसिद्ध असलेला वांटा शब्द ह्या वंठ्याचा भाउबंद दिसतो. अधिकाराच्या दर्जावरून दुसराहि ह्या विभागांचा एक प्रकार दिसतो, तो असा:—

२० गांवे किंवा कसब्यांवरचा अधिकारी=१ पाळेगार.

३३ गांवें किंवा कसब्यांवरचा अधिकारी=१ वड्डियार.

२०० गांवें किंवा कसब्यांवरचा अधिकारी=१ परगड. (परगणा ह्यावरून झाला असावा.)

२००० गांवे किंवा कसब्यावरचा अधिकारी=१ राजा. (हल्लींचा कलेक्टर.)

या प्रांतांतील प्राचीन शिलालेखांत कांहीं देशांच्या नांवांपुढें कधी कधीं भली मोठी संख्या दिलेली असते, व अमुक देशाची किंवा प्रांताची अमुक संख्या हे इतके ठरलेले असें की, केव्हां केव्हां देशाचें नांव न लिहितां फक्त संख्याच दिलेली असते. उ.-(गांगवाडी) ९६०००, (कोंगनाड) २००० वगैरे. ही संख्या कशाची दर्शक आहे हे निश्चितपणे समजत नाहीं, त्या नांवाच्या देशांत असलेल्या गांवांची ती संख्या असणे संभवत नाही, कारण लहानशा प्रांताच्या नांवापुढे लक्षावधींची संख्या दिलेली असते. कांहींचे ह्मणणे की ती संख्या त्या प्रांताचा वसूल असावा, व हेच ह्मणणें पुष्कळसे मान्य झाल्यासारखे आहे. कांहीं शिलालेखांत व दानपत्रांत ते लिहितेवेळीं अमुक जातीची इतकीं कुटुंबें हजर होतीं असा उल्लेख आढळतो. गुजराथेंतील कांहीं प्रांतांच्या नांवांत अशी संख्या आढळते. उ:-सुरत ८४, अठ्ठाविशी, अहमदाबाद

दसक्रोई किंवा दसक्रोशी वगैरे. कांहीं कारणानें देशाचे किंवा राज्याचे विभाग पाडून कोणाकडे किती गांवें गेलीं हें दाखविण्याकरितां त्या विभागाच्या नांवापुढें अशी संख्या घालण्याची रीत असावी. दसक्रोई ह्मणजे अहमदाबाद आणि त्याच्या आसपासचा दहा कोसांचा मुलूख. मराठींतही पंचक्रोशी ( पंचक्रोशी ) हा अशाच अर्थाचा शब्द प्रसिद्ध आहे.

विजयानगरचा राजा रामराय यांचे अमलांत राजतंत्राची वांटणी सात खात्यांत केलेली असे. ( १ ) प्रधानी दुर्गदक्ष ह्मणजे डोंगरी किल्ल्यासंबंधाचा प्रधान. ( २ ) भिलदक्ष ह्मणजे जलाशयाचे खात्याचा अधिकारी ( Irrigation Engineer ) ( ३ ) धर्मकर्ता किंवा दानाध्यक्ष. ( ४ ) सेनापति. ( ५ ) पुरदक्ष ( Prefect of Police or Governor ). ( ६ ) देवस्थानपति वगैरे. विजयानगरचे पुरदक्षाचे ताब्यांत १२००० पोलीस फौज होती. चिक्कदेवराज म्हणून म्हैसूरचे गादीवर एक अत्यंत शहाणा राजा होऊन गेला ( इ. स. १७०१ ); त्यानें राज्याच्या कामाची अठरा खात्यांत वांटणी केली होती. शुक्रनीतींत आठ किंवा दहा प्रधान असावे म्हणून सांगितलें आहे. ( १ ) पुरोधा. ( २ ) प्रतिनिधी. ( Viceroy ). ( ३ ) प्रधान किंवा मुख्य मंत्री. ( ४ ) सचिव किंवा सेनापति. ( ५ ) मंत्री ( Councillor ). ( ६ ) न्यायाधीश. (७) सुमंत्रक ह्मणजे फडणवीस. ( ८ ) अमात्य. ( ९ ) चार ( Spy ). ह्या प्रधानांची संख्या राज्याच्या महत्वाप्रमाणे किंवा सवडीप्रमाणे कमी-जास्ती असे. मंत्री हाच परराष्ट्रीय राजकारणाचा अधिकारी असे. न्यायाधिशास प्राड्विवाक असेही धर्मशास्त्रांत नांव आहे. अमात्याकडे जमीन मापणीचें आणि त्या संबंधाच्या दप्तराचें ( Land settlements and land Records ) काम असे.

**राजा, युवराज आणि त्यांचीं चिन्हें, वाद्यें, कर्तव्यें वगैरे.**

राजाचीं कर्तव्यें प्राचीन शिलालेखांत किंवा ताम्रपटांत एकत्र सांपडणे शक्य नाहीं. राजशासनावर लिहिलेल्या ग्रंथांतच तीं पाहिलीं पाहिजेत; तथापि प्राचीन राजे म्हणजे प्रजेच्या जीवित-वित्ताचे निरंकुश मालक अशी जी पाश्चात्यांनीं आपली समजूत करून घेतली आहे ती कितपत

खरी आहे हें पाहिले पाहिजे. नीति—वाक्यामृत नांवाच्या जैन ग्रंथांत राजा हा प्रजेचा किंवा राज्याचा एक प्रकारचा सेवक आहे असें " Studies in South Indian Jainism " नामक ग्रंथांत स्पष्टपणें सांगितलें आहे. तेथेंच असेहि सांगितले आहे कीं, माता आपल्या गर्भाचे रक्षण करिते तशा रीतीनें प्रजेचे रक्षण करणें हे राजाचें कर्तव्य होय असें हिंदु राजनीतिचें म्हणणे आहे. दुसऱ्या प्रकारांत राजावरील जबाबदारी केवळ नैतिक असून त्यास कोणी जबाब पुसणारा नाही असा ध्वनितार्थ ग्रंथभागास उद्दिष्ट दिसतो, पण तेंही विचारणीय आहे.

विनयकुमार सरकारकृत शुक्रनीतीच्या भाषांतरांत राजाच्या निरंकुशत्वासंबंधाने खालील मत दिले आहे.

The King is the master only in the sense that he is to protect people's interest and not that he can enjoy any rights & privileges or that he can treat people in any way he likes. His position is that of servitude. पान २५ वरील शुक्रनीति भाग २ पृष्ठ ५४ वर असेंहि म्हटले आहे की, According to Hindoo socio-political Institutions, the King is considered to be a God, but his infallibility & divinity which obtain in European theories of monarchy have never been recognized. On the contrary, ample safeguards have been provided to protect the people against the King's arbitrary conduct & oppression

हिंदु लोकांच्या सामाजिक—राजनीतिदृष्टया राजास जरी देव मानिला आहे. तथापि पाश्चात्य ( युरोपीय ) धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणे तो निष्प्रमाद असा एक देव आहे असे त्या शास्त्रानें कधींच मानिलें नाही. उलट राजाच्या निरंकुश वर्तनानें लोकांवर जुलूम न होऊं देण्याविषयी त्या शास्त्रांत चांगली खबरदारी घेतली आहे. उदाहरणार्थः—राजानें आपला कारभार,—जींत त्याचे मंत्री व लोकप्रतिनिधि सदस्य म्हणून आहेत—अशा सभेंतील मताच्या धोरणानें चालवावा, आपल्याच हेक्यानें चालवूं नये. जो राजा आपलाच हेका चालवितो त्यावर प्रजाजन आणि राज्य ही

असंतुष्ट होतात, आणि ह्या असंतोषानें तीन प्रकारचे अनर्थ उत्पन्न होतात, ते असे:– १ दारिद्य व चोरादिकांचें भय, २ प्रजा व राजमंत्री यांचा क्षोभ, आणि ३ राजाच्या हातचें राज्य जाणें. याचा इंग्रजी उतारा खालील प्रमाणे आहे.

The wise ruler should ever abide by the well thought-out decision of councillors, office-bearers, subjects & members attending the meeting; never by his own opinion. The monarch who follows his own opinion is the cause of miseries, soon gets estranged from his kingdom and alianated with subjects. The three calamities following the arbitrary conduct of the king are stated to be ( 1 ) Disasters befalling subjects such as poverty & crime. ( 2 ) The subjects rising in rebellion. ( 3 ) The king losing his dominion.

जुलमी राजाविरुद्ध प्रजेनें उठून त्यास पदच्युत करणें ह्मणजे राज्यक्रांति करणे होय. येथपर्यंत शुक्राचार्यांनीं आपली मजल पोहोंचविली आहे असें ह्यावरून स्पष्ट होते; परंतु ह्या शासनांतील एक उणीव कबूल केली पाहिजे, प्रजेचे सदस्य कसे घेत ते समजत नाहीं. मंत्री नेमणे हें सर्वस्वी राजाच्या ताब्यांतील असल्यानें जुलमी राजा आपल्या कह्यांत वागणारेच मंत्री नेमणार, आणि त्याविरुद्ध प्रजेस दाद मिळविण्यास कांहीं साधन ठेवलेले दिसत नाहीं. प्रकृतींचा संक्षोभ होण्यास जुलमांचा अतिरेक व्हावा लागतो, आणि तशा कडेलोटास गोष्ट पोहोचण्यापूर्वी प्रजा आपले निर्वाणीचें शस्त्र उपसणार नाहीं हें उघड आहे, व अशा कडेलोटाच्या थरास गोष्ट न पोहोचवितां पुष्कळ जुलूम करण्यास राजास वाव आहे. ह्या देशांत प्रजाचा संक्षोभ झाल्याचीं उदाहरणे अगदीं थोडीं आहेत. हे येथील राजांच्या नीतिमत्तेस तसेंच प्रजेच्या राजभक्तीस भूषणावह आहे. दार्दानेलीसच्या सामुद्रधुनींत अशी काय जादू आहे कीं, तिच्या पश्चिमेकडील युरोपखंडांत प्रजासत्तेची लाट फारच जोरानें उसळावी ! परंतु पूर्वेकडील आशिया खंडांत त्या गोष्टीचा मागमूसहि नसावा ! असा प्रश्न नेहमीं

मनांत घोळतो. याच्या अनेक कारणांपैकीं एक कारण असें दिसतें कीं, वैदिक, बौद्ध, महंमदी वगैरे पौर्वात्य धर्मांत प्रजापालनाविषयीं जितक्या कडक आज्ञा आणि निर्बंध आहेत तितके पाश्चात्य धर्मांत नसावे. हिंदु राजनीतींत असा निर्बंध आहे कीं, राजानें अत्यंत त्यागी, तपस्वी, शुचिर्भूत आणि विद्वान अशा ब्राह्मणांस मंत्री नेमावे. "मुद्राराक्षस" नाटकांतील चाणक्य व राक्षस ह्यांसारखे निस्पृह आणि सदाचरणी ब्राह्मण जोंपर्यंत राजास मंत्री ह्मणून मिळत होते, तोंपर्यंत प्रजेवर जुलूम होण्याची भीति नव्हती. त्या नाटकांत महाराजाधिराजाचा मुख्य मंत्री जो चाणक्य त्याच्या प्रासादाचें आणि संपत्तीचें वर्णन फारच मौजेचें आहे. त्याचा प्रासाद म्हणजे एक पर्णकुटिका होय. ती इतकी मजबूत कीं, समिधांच्या जुडग्याच्या भाराने लवलेली. त्याचें आसन म्हणजे एक शिलाखंड, व संपत्ति म्हणजे अग्न्याहुतिसाठीं तयार करून ठेवलेल्या गोमयाच्या गोळ्यांची रास. नाटकांतले हें वर्णन थोडेसें अतिशयोक्तियुक्त आणि काल्पनिक असलें तरी त्यांत पुष्कळ सत्यांश आहे. देवगिरीच्या राजाचा मंत्री हेमाद्रीपंत, विजयानगरचा माधवाचार्य, जो पुढें विद्यारण्य हें नांव धारण करून शृंगेरी मठाच्या गादीवर आरूढ झाला. कवि व भक्त एकनाथांचे गुरू जनार्दनपंत, रामशास्त्री प्रभुणे वगैरे प्रसिद्ध पुरुष या विधानाची साक्ष देत आहेत. त्याबरोबरच अत्यंत नीतीने वागणारे असे भीष्म, जनक, श्रीरामचन्द्र, युधिष्ठिर, शिवाजी महाराज, श्रीमंत अहिल्याबाई होळकर, माधवराव पेशवे ह्यांसारख्या राजांचींहि पूज्य नांवें स्मृतींत उभी राहतात.

राष्ट्रध्वज.

दक्षिण हिंदुस्थानांत निरनिराळ्या राजघराण्यांचे ध्वज वेगळे असत एवढेच नव्हे तर त्यांची वाद्येहि वेगळी असत. कांहीं वाद्यांचीं उदाहरणे खाली दिली आहेत:—

| घराणें. | वाद्याचे नांव. |
|---|---|
| १ पल्लव. | कटुमुख व समुद्रघोष या नौबती. |
| २ राष्ट्रकूट ( मालखेडचे ) | त्रिवली. |
| ३ कलचुर्य. | डमरूक. |
| ४ कदम्ब (हानगळ आणि गोव्याचे) | परमट्टी. |
| ५ पश्चिमेकडील गांग राजे. | शासनदेवी किंवा विजयभेरी. |

ह्यांतील कांहीं वाद्यें कशीं होतीं ते आज कळत नाहीं. " शासनदेवी " हें एक जैनांचें उपास्य दैवत आहे. कदंब राजे हे प्रथम जैनधर्मी होते म्हणून त्यांच्या भेरीचे नांव शासनदेवी असें असावें.

ह्या विषयावरहि प्राचीन शिलालेख व ताम्रपट ह्यांत फारशी माहिती सांपडण्याचा संभव नाही. दक्षिण हिंदुस्थानांत एकाच ठिकाणीं ह्मणजे मैसूर राज्यांतील मोरकोळ-

राज्यघटना.

मुरु तालुक्यांत अशोकाचे स्तंभलेख आहेत, त्यांत त्या वेळच्या राज्यघटनेची थोडीशी माहिती मिळते. ह्या लेखांवरून दिसते की, राजपुत्र ( आयपुत्त ) हा एका देशाच्या कारभारावर नेमिला जात असे; परंतु तो स्वतंत्र नसतां त्याच्या मदतीस त्याच्या एवढेच अधिकार धारण करणारे महामात्र नांवाचे अधिकारी नेमीत. आयपुत्तावर नजर ठेवून त्यास योग्य दाबांत ठेवणे व तो आपल्या अधिकाराचा अतिक्रम करीत नाहीं असें पाहणे, हे ह्या महामात्रांचें काम असे. महामात्रांच्या कर्तव्यासंबंधानें अनुक्रमांक ७ व ८ ह्यांत खालील विधान आहे. " मी धर्ममहामात्रांची नेमणूक केली आहे. गृहस्थ, संन्याशी ( भिक्षु) वगैरे सर्व लोकांच्या सार्वजनिक धर्मादायांच्या कृत्यांवर ह्मणजे इष्टा, पूर्ति सारख्या धर्मकृत्यांवर ते देखरेख ठेवतील. महामात्र नांवाचे अधिकारी क्षत्रियांस जरूरीप्रमाणें मदत करतील, परंतु धर्ममहामात्र नांवाचे अधिकारी क्षत्रिय व इतर सर्व लोकाचीं कामे पाहतील " वरील अवतरणावरून दिसते की, महामात्र हे मोठ्या श्रेष्ठ दर्जाचे अधिकारी असून राजाच्या आज्ञेचा अंमल योग्य रीतीनें होत आहे, हें पाहण्याचें त्यांचें काम होतें. रज्जुक नांवाच्या अधिकाऱ्यांचा उल्लेखहि ह्या लेखांत आहे. ह्या अधिकाऱ्यांचा दर्जा खालच्या प्रतीचा दिसतो, त्यांचे काय काम असे तें कळत नाहीं.

अशोकानंतरच्या काळांत महाप्रधान अथवा सर्वाधिकारी हा राजाचा मुख्य मंत्री होता असें दिसते. राजतंत्राचा हाच मुख्य असून युवराज व इतर मंत्री हे ह्याचे सहकारी असत. ह्या मंत्र्यांपैकी कांहीं महामंडलेश्वर असत. हे महामंडलेश्वर मांडलिकांच्या स्वरूपाचे, मोठे व पिढीजाद-

अमीर-उमराव असत. ह्यांसच " पार्थिव ( घटक ) असेंहि नांव असावें. श्रीहर्ष राजाचा भाऊ आणि बाण कवीचा परममित्र " कृष्णराज " ह्यास उद्देशून बाणानें खालील श्लिष्ट पद्य लिहिलें आहे.

अतिगंभीरे भूपे कूप इव जनस्य निखतारस्य ।
दधाति समीहितसिद्धिं गुणवन्तः पार्थिवा घटकाः ॥

ह्यावरून कृष्णराजासारख्या दर्जाच्या लोकांस हा शब्द लावीत असें दिसते. खोल व बिनपायऱ्यांच्या विहिरींतील जीवनाचा लाभ होण्यास जशी गुणवन्त म्हणजे दोरानें युक्त अशा पार्थिव म्हणजे मातीच्या घटाची जरूर असते, त्याप्रमाणें ज्याचें दर्शन दुष्प्राप्य अशा राजापाशीं लोकांची दाद लागण्यास गुणयुक्त अशा सामंतांची जरूर असते, असें म्हणण्याचा बाण कवीचा आशय आहे.

राज्याचे मोठमोठे इलाख्यासारखे विभाग पाडून त्यांवर हल्लींच्या गव्हर्नरांसारखे " दंडनायक " ( दन्नायक ) नांवाचे अधिकारी नेमीत. मुलकी व लष्करी दोन्ही अधिकार ह्यांजकडेच असत. नवीन जिंकलेल्या मुलखांत सेनापतीचीच नेमणूक दंडनायकाच्या जागीं करण्यांत येई. जमीन महसुलाच्या हिशेबी कामाकरितां ' करणीक ' किंवा ' श्रीकरणीक ' नांवाच्या अधिकाऱ्यांची मोठी संख्या असे. श्रीकरण ह्मणजे हिशेब ठेवणे. ही मोठी महत्वाची बाब समजली जात असून ह्या कामावर नेमलेल्या अधिकाऱ्यासंबंधानें " श्रीकरणाधिनियुक्तः " असे शिलालेखांत वारंवार आढळतें.

जकाती वगैरे करांच्या वसुलाचें काम मक्त्यानें दिलें जात असे, किंवा खालसा वहिवाटीनें करण्यांत येई. उंची जिनसांवरील जकात आणि हलक्या जिनसांवरील जकात, असे जकातीचे मुख्य दोन प्रकार असत. परचुरण जकातीस ' किरुकोळ ' असें नांव आहे. मराठी शब्द किरकोळ, हा ह्या शब्दाचा अपभ्रंश दिसतो. ओडु व्यवहारी किंवा ओडु रावळ ह्या नांवाचेहि अधिकारी असत. त्यांचें काम काय असे हें नीट समजत नाहीं,

तथापि लष्कराकडील लागवड खात्याचे ( Commissariat ) हे अधिकारी असावे असे वाटते.

शेतीच्या लायक अशी जमीन राजाच्या मालकीची मानिली जाई.

जमिनीचे सत्ता, प्रकार, धारा वगैरे

नवीन लागवडीस आणलेल्या जमिनींत उत्पन्न येऊ लागून नफा होईपर्यंत राजाने ती धारण करणारापासून कर घेऊं नये असे शुक्रनीतींत सांगितले आहे. बागाईत, जिराईत व डोंगराळ किंवा खडकाळ जमिनीवर तिच्या मगदुराप्रमाणे निराळे दर लाविलेले असत. ग्रामसंस्थेचें वर्णन करतांना जमिनीची पाहणी व प्रत करून धारा ठरविल्याची दोन उदाहरणें पूर्वी दिलीं आहेत. पूर्वेकडील गांग—कलिंग वंशांतील अनग भीमदेव ह्या नांवाचा राजा फार नामांकित झाला होता, त्यानें आपल्या राज्यांतील जमिनीची मापणी करून धारेबंदी केली होती. ह्या राजाची कारकीर्द इ. स. ११७५ पासून १२०२ पर्यंत होती. ह्या धारेबंदीत हल्लीं प्रमाणें जमीन धारण करणारांपासून नक्त वसूल घेतला जात असे असें वाटत नाहीं; तथापि तशा रीतीने घेतला जात नव्हताच असेंहि म्हणवत नाहीं, कारण शिवाप्पा नायकाचे धारेबंदीत खालील प्रमाणे दर दिले आहेत.

| उत्तम जमीन. | | | | कनिष्ठ जमीन. | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| जात. | पागोडा. | फणम्. | आणे. | जात. | पागोडा. | फणम्. | आणे. |
| उत्तम. | १ | ० | ० | उत्तम. | ० | ८ | १२ |
| मध्यम. | ० | ७ | ८ | मध्यम. | ० | ३ | ४ |
| कनिष्ठ. | ० | ५ | ० | कनिष्ठ. | ० | ३ | १२ |
| अधम. | ० | २ | ८ | अधम. | ० | १ | ४ |
| अधमाधम. | ० | १ | ० | अधमाधम. | ० | ० | १० |

बागायतीचे दर वरील दराशिवाय वेगळे होते. गड्डीनाड नांवाच्या प्रांतांत त्याची वेगळी धारेबंदी होती. ह्याचे धाराबंदीचा सरासरी दर एकंदर ( Gross ) उत्पन्नाच्या ⅙ पडतो. हल्लीं हे घेणें रास्त, असें ठरविलें आहे.

शुक्रनीतींत बागायत जमिनींच्या उत्पन्नाचा १/२, १/३, किंवा १/४ हिस्सा राजानें घ्यावा असें सांगितले आहे, व जिराईताचा १/६ वा हिस्सा घ्यावा असें सांगितलें आहे. प्रत्येक धारण करणारास एक धारापत्र देऊन त्यांत राजानें घ्यावयाचा कर नमूद करावा असेहि सांगितले आहे. हा नियम विसावे शतकास शोभेल असा आहे.

विजयानगरचे साम्राज्य इ. स. १३३६ पासून १६६४ पर्यंत अस्तित्वांत होते. इ. स. १५६५ तील तालिकोटच्या ( राक्षतंगडी ) लढाई नंतर ते अगदीं खालावले होतें. ह्या राज्याचे भरभराटींत राज्यांतील जमिनीची मापणी, प्रत व धारेबंदी ठरवून आणि आजच्या प्रमाणें पत्रके ( रजिष्टरे ) बनवून तीं गांवोगांव ठेवण्यांत आलीं होतीं. अव्वल इंग्रजींत, माळनाट प्रदेशांत असलीं दप्तरें आढळण्यांत आलीं होतीं.

**इनाम वगैरे जमिनी.**

पूर्वी चांगली सेवा करण्याबद्दल, लढाईतील शौर्याबद्दल, विद्वत्ता व पांडित्य ह्याबद्दल आणि ग्रामसेवेबद्दल सरकारांतून गांवे किंवा जमिनी इनाम देत असत. ह्या इनामास " मान्यम् " असे सामान्य नांव आहे. मराठी मायन्यांतील राजमान्य शब्दाचा " ह्या मान्यमशी " संबंध दिसतो. देवदायम्, अग्रहारम्, श्रोत्रियदायम्, उंबळीके वगैरे इनामांचे प्रकार आहेत. इनामदारांवरही सरकारचा एक कर असे, त्यास जोडी म्हणत. ही जोडी हल्लींहि इनामदारांपासून इंग्रजी राज्यांत घेण्यांत येते. पूर्वी सांगितलेला " दशवंद " हाहि इनामाचा एक प्रकार आहे. जमिनी इनाम देताना सरकार हकाची अप्रदेयता ठेवीत असत. शासनपत्रांत असा हक्क राखून ठेवल्याबद्दल नमूद केलें असे. हे वाचून हल्लींच्या सरकार घेण्याच्या " First charge " ह्या शब्दांची आठवण होते. सरकार धान्यास " कंदायम् " असा कानडी शब्द आहे. खंड हा मराठी शब्द ह्यावरूनच निघाला असावा. जमिनीस विश्रांति देण्याकरितां ती मधून मधून पडीत ठेवीत असत. अशा जमिनीस कानडींत " ओहले " म्हणतात. भरूच वगैरे कापसाच्या पिकाच्या मुलखान ही चाल अद्यापपर्यंत होती. गुजराथेत अशा पडीत ठेवलेल्या जमिनीस

" वामल " म्हणतात. हा शब्द " ओहल " चा अपभ्रंश दिसतो. धान्य वगैरेच्या भावाच्या आणि सरकार धान्याच्या वाढीमुळे ही अति उपयुक्त चाल नष्ट होत चालली आहे, आणि त्यामुळे जमिनीचा कस उतरला आहे अशी लोकांचा ओरडआहे. उत्तर विभागचे कमिशनर सर एफ्. एस्. पी. लीली ह्यांनी अशा रीतीनें पडीत ठेवलेल्या जमिनीवर त्या सालापुरता सरकार धारा अंशत: माफ करून ह्या चालीचे पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न केला होता, परंतु तो यशस्वी झाल्याचें दिसत नाही. फसली दोन असत. एक कार्तिकी व दुसरी वैशाखी. चित्रा नक्षत्राचे पावसासंबंधानें कोंकणांत म्हण आहे तशीच तैलगणांत भरणी नक्षत्राचे पावसाबद्दल आहे कीं, ' भरणी वसते धरणी पडोडु '.

धाराबंदीच्या संबंधानें वर लिहिले आहे, त्याशिवाय दुसरे रोकड कर पुष्कळ होते. कांहींचें प्रकार खालीं दिले आहेत.

कर.

तेली, मोची, ( जोडे शिवणारे चांभार ) साळी, वाणी वगैरे व्यापाऱ्यांवर कर असत. लग्नावरहि कर असे. आयात, निर्गत मालावर जकाती असत; तसेंच हल्लीं शहरांत येणाऱ्या मालावर जकात " Octroy " घेण्यांत येते, त्याप्रमाणेंच त्यावेळींहि घेण्यांत येत असे. भाजीपाला, फळफळावळ वगैरे जिनसांवर त्या विकण्याचे ठिकाणीं जकात घेतली जाई. घरपट्टी आणि खिडक्या, दारें ठेवण्याबद्दल पट्टी होती. गुजराथेत ही पट्टी माझे पाहण्यांत आली होती. शुक्रनीतींत सडकपट्टी घ्यावी आणि तिच्या उत्पन्नांतून रस्ते करावे असे सांगितले आहे. नाण्याची किंमत उतरल्यानें एक नवा कर घालण्यांत आला होता, त्याचे नांव ' देवराज ( एक म्हैसूरचा राजा ) उट्ट '. उट्ट शब्दाचा अर्थ नुकसान भरपाई असा दिसतो, व मराठींतील उटें काढणें ह्या शब्दद्वयाचा मूळचा अर्थ तो असावा. जमिनीचा धारा ज्याप्रमाणें पाटलाचे मार्फत वसूल करण्यांत येत असे, त्याप्रमाणें शहरांतील वाणी, उदम्यांवरील कर ' पेठशेटी ' किंवा ' नगरशेटी ' मार्फत घेण्यांत येत असत. हे करहि महाजनांच्या सल्ल्यानेंच ठरवीत असावे असें वाटतें. श्रीमंत गायकवाड सरकारचे

म्हैसाणा जिल्ह्यांत खुद्द म्हैसाण्यासंबंधाचे २००–२५० वर्षांपूर्वीचे पुरावे पहात असतां ही चाल माझें पहाण्यांत आली होती. गुजराथेंत आजहि गांवोगांव महाजन व नगरशेट आहेत. विजयानगरचे साम्राज्याचा संस्थापक 'बुक्क' ह्याचा मुलगा दुसरा हरिहर ह्याच्या वेळच्या एका शिलालेखांत ह्मटले आहे कीं, "विजयानगर व आजूबाजूच्या २० बाजारपेठांचे वाणी–उदमी ह्यांचे आश्रित आणि होलेयार लोक ( अंत्यज ) हे विरूपाक्षाचे देवळांत एकत्र होऊन सल्ला–मसलत करून त्यांनी ठराव केला की, राजाचे मुख्य प्रधानास सर्व राज्याचे 'नगरशेटपण' द्यावें, ( Univeral mayorality ) व त्या लेखांत नमूद केलेले कर त्या त्या धंद्याच्या लोकांनीं द्यावे." हा लेख इ. स. १३८१ चा आहे. वारांगनांवरहि कर असत. इ. स. १४४१ त विजयानगरचा राजा देवराय ह्याचे अमदानींत इराणचा वकील त्याचे दरबारीं आला होता. त्यानें ह्या वारांगनांच्या रूपाचें आणि त्यांच्या लीलांचें मनोवेधक वर्णन केलें आहे. गुत्ता हें करांचें सामान्य नांव आहे. हल्लींचा दारूचा गुत्ता हा शब्द वरील शब्दापासूनच निघाला असावा. दारुविक्याचे नांव कोईलाल, हल्लींच्या कलाल शब्दाचें हें मूळ दिसतें. भाजीपाल्यावर जो अगदीं हलका कर असे त्याचें नांव "फुसकी" हा शब्दहि मराठींत व गुजराथींत अज्ञात नाहीं. सुंक नांवाचा एक कर असे व हें लहान कराचें सामान्य नांव दिसतें. तोडरूक नांवाची एक प्रकारची खंडणी ( Tribute ) होती. तोडा गिरास नांवाचा रजपूत व कोळी जातीच्या ठाकोरांचा आणि गिराशीयांचा एक रोकड हक्क आहे. हा पुंडाव्यानें किंवा जबरदस्तीनें आपल्या गांवाच्या किंवा आसपासच्या गरीब रयतेवर ह्या लोकांनीं लादलेला कर आहे असें मानण्यांत येतें. ह्या शब्दाची व्युत्पत्ति लागत नाहीं. जुन्या चालीच्या बंदुकीस दारु पेटविण्याकरितां जी युक्ति योजिलेली असते तिला तोडा म्हणतात. जबरदस्तीचा कर आणि तोडा शब्द हा योग जुळतांच बंदुकीचे तोड्यावरून ह्या कराचें नांव पडलें असावें असें इंग्रज तज्ञांनीं ठरविलें आहे. मला वाटतें वरील तोडरूक या कानडी शब्दाचा तो अपभ्रंश असून ही खंडणी फार जुनी दिसते. परदेशांत निर्गत होणाऱ्या मालावर घेतल्या जाणाऱ्या

जकातीचें नांव " मार्गादायम् " व मालाच्या उत्पत्तीवर घेतला जाणारा जो कर ( Excise ) त्याचें नांव " स्थलादायम् " वगैरे करांचीं नांवें आहेत.

नाणीं.

कंठीराय नांवाच्या म्हैसूरच्या राजाने सोन्याची टांकसाळ घालून 'वराह' नांवाचे नाणे पाडिले. ह्या नाण्यावर वराहावताराचे चित्र व नरसिंहाची मूर्ति खोदलेली असत. पोर्तुगीज लोक ह्या नाण्यास त्यावरील देवळामुळे 'पागोडा' ह्मणत. इ. स १६०४ चे सुमारास हा राजा गादीवर होता. 'गद्यान' ह्मणूनहि एक नाणे असे. गुजराथेत 'गद्यान' हें सोन्याचें वजन आहे. तें अर्ध्या तोळ्याएवढे असतें, शिवाय 'निष्क' नांवाचेहि जुने नाणें असे. 'होन', 'हन' किंवा 'पण' नांवाचेहि एक नाणे होतें. पूर्वी धारवाडी होन हें प्रसिद्ध नाणें असे. 'विशा' ह्मणून एक लहान नाणें होतें, व कांहीं जातींच्या लोकांवर ह्या अमुक विशांचा कर बसविला जात असे. गुजराथेंत वाण्यांच्या बहुतेक जातींत दशा आणि विशा असे दोन पोटभेद असतात. कर्नाटकांतहि 'दशागौड' असे नांव शिलालेखांत आढळतें. ज्या जातीला दहा विशांचा कर द्यावा लागे ती 'दसविशा' किंवा 'दशा' आणि जीस वीस विशांचा कर द्यावा लागे तीस 'वीसविशा' किंवा विशा असा ह्या शब्दांचा अर्थ आहे कीं काय ते कळत नाही. त्या जातीच्या लोकांस ह्या शब्दांची व्युत्पति माहित नाहीं असे ते ह्मणतात; तथापि कांहीं करांशीं या नांवाचा संबंध असावा अशी प्राचीन आख्यायिका त्यांच्यांत रूढ आहे. कंठीराय वराहाची किंमत ३॥ रु. असे.

तगाई.

पडीत जमीन लागवडीस आणण्यासाठीं किंवा शेतकामास मदत करण्यासाठीं तगाई देण्याची रीत होती. स्वदेशांत किंवा परदेशाशीं केल्या जाणाऱ्या व्यापारास उत्तेजन देण्याकरितां कर्जाऊ भांडवल देण्यांत येई, किंवा सवलतीचे कर ठेवण्यांत येत, किंवा त्यांची माफी करण्यांत येई.

बारा बलुत्यांत केव्हां केव्हां गांवच्या शिक्षकाचा समावेश करण्यांत येई. इ. स. ११७४ चा एक मनोरंजक शिलालेख आहे, वीरबल्लाळ होशळ राजाने 'मुरीहिंडी' नांवाचा गांव आपल्या मुख्य प्रधानास इनाम दिला होता; प्रधानानें तो शिक्षणासाठीं धर्मादाय देऊन एक शाळा काढली, तींत मुलांची राहण्या-जेवण्याची तजवीज केलेली असून मुलांस कानडी भाषा शिकविण्यांत येत होती. त्याच सालच्या दुसऱ्या शिलालेखांत राजाचे मुलास कानडी शिकविण्याकरितां शिक्षक नेमल्याचा उल्लेख आहे.

शिक्षण.

आयात व निर्गत मालावर जकात घेतली जाई त्या स्थळास 'कट्टा' म्हणत (उ. मराठी सराफ कट्टा) होयशळ-राजा दुसरा बल्लाळ ह्याच्या आमदानींतील इ. स. ११९९ चा एक लेख आहे, त्यांत म्हटले आहे कीं, एक ब्राह्मण व्यापारी घोडे, हत्ती आणि मोत्यें ह्यांची आयात करून तीं तो राजे लोकांस विकीत असे. (वरील तिन्ही व्यापाराचे जिन्नस हे चौदा रत्नांतील आहेत) हा माल तो गलबतांत भरून आणी. दुसऱ्या एका व्यापाऱ्यासंबंधाने त्यांत म्हटले आहे की, तो चारही दिशांत व्यापार करी. Epigraphica Karnataka No. 25 च्या लेखांत, मलबारांतील दामोदर शेटी नांवाच्या व्यापाऱ्याने पुष्कळ जमिनी खरेदी घेऊन प्रसिद्ध चन्नकेशव देवास त्या पूजा नैवेद्यासाठीं अर्पण केल्या असें सांगितले आहे. ह्याच लेखांत आरशी कोंडनांबी नांवाच्या व्यापाऱ्याने काशी, पढरपूर, हरिहर आणि रामेश्वर येथे अन्नछत्रे घातल्याचा उल्लेख आहे. विष्णुवर्धन होयशळ राजाने नवीन व मोठें कोल्हापूर (डोड्ड गड्डवल्ली) नांवाचे शहर वसविले. जुने कोल्हापूर म्हणजे हल्लीं ज्यास कोलार म्हणतात आणि ज्याच्या आसमंतात सोन्याच्या खाणी आहेत ते होय. या नवीन कोल्हापूरांत एका धनाढ्य व्यापाऱ्याने व त्याच्या स्त्रीने महालक्ष्मीचें देऊळ बांधविले होते. हल्लींच्या दक्षिण महाराष्ट्रांतील कोल्हापुरांतहि प्रसिद्ध महालक्ष्मीचे देऊळ आहे हे ध्यानांत ठेवण्यासारखे आहे. ह्यावरून हे व्यापारी समुद्रावर मोठा व्यापार करून फार श्रीमंत होत, हें उघड दिसते.

व्यापार.

ही बाब पुरी करण्यापूर्वी एका पौराणिक कथेची आठवण होते, ती देवासुरांनीं केलेलें समुद्रमंथन होय. कवींनीं रूपक रूपाने ही कथा बसविली असावी असे वाटते, कारण प्राचीन काळीं पश्चिम किनाऱ्यावर समुद्राचे मार्गाने इराण, अरबस्तान, कच्छ, गुजराथ वगैरे देशांशीं फार दांडगा व्यापार चालू होता असे दिसते. पूर्वेकडील कारोमांडल (चोलमंडल) किनाऱ्यावर सोयीचीं बंदरे नाहींत; शिवाय त्याकाळीं हिंदुस्थानाशीं व्यापार करतील व त्या वेळच्या जहाजाच्या सफरीच्या आटोक्यांत येतील असे देश पूर्वसमुद्रांत नाहींत. पश्चिम किनाऱ्यावर ह्याचे उलट स्थिति आहे. सर्व कोकणभर शेंकडो खाड्या आहेत. मलबार, कोचीन, त्रावणकोर, म्हैसूर या सारखे सुपीक व संपन्न देश आहेत आणि त्यांशीं व्यापार करण्याला उत्सुक असणारे इराण, अरबस्थानासारखे देशहि नजीक आहेत. समुद्रयानांच्या रचनेत आज एवढी क्रांति झाली आहे आणि पृथ्वीच्या हव्या त्या कोनाकोंपऱ्यांत आणि थेट ध्रुवापाशींहि तीं याने जाऊं शकतात, असें असूनहि मुंबई बंदराची बरोबरी मद्रास करू शकत नाही; येवढेंच नव्हे तर कलकत्त्याशिवाय दुसरे कोणतेंच बंदर ती करूं शकत नाहीं. टॉलेमीचे भूगोल वर्णनांत हिंदुस्थानच्या सर्व पश्चिम किनाऱ्याचा उल्लेख आहे आणि 'पेरिप्लस' नांवाच्या व्यापारविषयक प्रवासवर्णनांतहि भृगुकच्छ म्हणजे भरूच वगैरे व्यापारी ठिकाणांचा उल्लेख आहे. असुर लोक म्हणजे कोण असतील हे नक्की सांगता येत नाही, परतु प्राचीन सुर आणि असुरांनीं म्हणजे आर्य आणि असुर ( हे बहुतकरून अनार्य द्रविडी असावेत ) लोकांनीं मोठ्या जहाजांच्या द्वारे परदेशांत सफरी करून संपत्ति आणिली त्याचें रूपक हे समुद्रमंथन होय असे मला वाटते. फार मोठ्या जहाजास डोंगराची किंवा निदान टेकडीची तरी उपमा शोभेल; तसेंच त्याचें डोलणें, वाऱ्याच्या जोरानें तें चालले असतां त्याच्या वेगानें पाणी कापणे वगैरे गोष्टीवरून मंथानदंड म्हणजे रवी आणि तिचें घुसळणे या गोष्टींची कल्पना सहज येण्यासारखी आहे. इंग्रजींतहि गलबताचे गतीस घुसळण्याची उपमा देतात, म्हणजे तीस ( Churning of the sea ) असें म्हणतात. मंथन करून जीं चौदा रत्नें समुद्रांतून काढिलीं त्यांतील बरींच इराणांत व अरब-

स्थानांत उत्पन्न होणारीं दिसतात. उदा:- कौस्तुभ म्हणजे मोत्यासारखीं रत्नें, सुरा, अश्व, लक्ष्मी (म्हणजे सुंदर स्त्री किंवा सामान्यत: धन) धन्वंतरी म्हणजे युनानी वैद्य असण्याचा संभव आहे. पारिजातक हें झाड मूळचें हिंदुस्थानांतलें नव्हे, तें बाहेरून या देशांत आलें आहे असे त्याच्या व्युत्पत्तीवरून दिसतें. (पार: अस्य अस्ति इति पारिन् समुद्र: तस्मात् जात: पारिजात: तस्य समुद्रोत्पन्नत्वात्-आपटे यांचा कोश) चन्द्रमा म्हणजेहि एकादें रत्न असेल. प्राचीनकाळीं व हल्लींहि इराणांतील, शिराझी नांवाच्या दारूसारख्या दारू फार प्रसिद्ध आहेत.

(But still the Vine her ancient Ruby yields. Ummer khayyam Rubaiyat V.)

अरबस्थानांतील व इराणांतील घोड्यांची प्राचीनकाळापासून प्रसिद्धि आहे व आजमितीसहि इराण व अरबस्थानांतून पुष्कळ घोडे हिंदुस्थानांत आणले जातात. दामोदर शेटी नांवाचा व्यापारी तिकडून हात्ति आणीत असे असें वर लिहिलेच आहे. इराण व त्याचे नजीकचे सीरिया, असीरिया वगैरे प्रांत ह्यांतील स्त्रिया लावण्याविषयीं प्राचीनकालापासून प्रसिद्ध आहेत. असीरिया वगैरे देशांतील रूपवती स्त्रिया टर्कीच्या सुलतानास नजर केल्या जात असत असें इतिहास सांगतो. सारांश ह्या चौदा रत्नांकडे पाहिले म्हणजे आर्य व अनार्य एकजुटीनें इराण व अरबस्थान देशांकडे सफरी करीत आणि संपत्ति आणीत. या गोष्टीवर प्राचीन कवीनें आपली कल्पना लढवून या सफरींना समुद्रमंथनाचें रूप दिलें असावें. वासुकी, मंदर, हे असुर वंशाचे राजे असावे. याविषयीं विशेष खुलासा नाग लोकांसंबंधाच्या हकीकतींत दिला आहे. प्राचीन राजे शिकारीस वगैरे जातांना यवनी स्त्रिया त्यांजबरोबर असत, व संस्कृत नाटकांत ह्या गोष्टीचे उल्लेख आहेत.

**दळणवळणाचीं साधनें.**

पूर्वी पायरस्त्याच्या प्रवासाकरितां सडका सारखे रस्ते केले असत कीं काय, हे समजण्यास साधन नाहीं. अशा रस्त्यांचा प्राचीन लेखांत उल्लेख दिसत नाहीं. शुक्रनीतींत व चाणक्याच्या ग्रंथांत राजधानी कशी बांधावी हें विस्तृतपणे सांगितलें

असून राजमार्ग, वीथि वगैरे प्रकारचे रस्ते सांगितले आहेत. त्या रस्त्यांची किती रुंदी असावी हेहि सांगितलेलें आहे. विजयनगर शहर शुक्रनीतींत सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें बांधलेले होते असे आजच्या त्याच्या अवशेषावरून दिसते; परंतु हें वरील सर्व विधान शहरांस लागू आहे. रस्त्यांच्या दुरस्तीकरितां कर घेण्याविषयीं शुक्रनीतींतील कथनाचा वर उल्लेख आला आहेच. इष्टापूर्ताचीं जीं कामे सांगितलेलीं आहेत त्यांत रस्त्यावरून छायेसाठीं झाडें लावण्यास सांगितलेले आहे, आणि त्यावरून असे दिसते की दूरच्या प्रवासाकरितां आंखींव असे रस्ते होते आणि त्यांच्या बाजूस झाडें लावतां येण्यासारखे ते होते. पूर्वी बीड, पैठण वगैरे प्राचीन शहरे ह्या मोठमोठ्या राजधान्या असून व्यापारी पेठाहि होत्या व ह्या शहरांवरून पूर्वेस व पश्चिमेस असलेल्या बंदरांपर्यंत माल जात असे असें दिसते. दक्षिण हिंदुस्थान आणि काठेवाडचा किनारा ह्यांतहि पूर्वी समुद्रमार्गानें दांडगें दळणवळण होते. होयशळ राजे हे स्वतःस यादव वंशाचे ह्मणवीत आणि त्यांनीं आपल्या राजधानीचें नांव द्वारसमुद्र असे ठेविलें होतें. दक्षिणेकडील दुसरेहि कांहीं क्षत्रिय आपणांस यादव वंशी ह्मणवीत असत. म्हैसूर प्रांतांत एक कोष्ट्याची जात आहे ते आपणांस "सौराष्ट्रक" ह्मणवितात व काठेवाडांतून मूळ आपण आल्याचे सांगतात, तसेंच काठेवाडांत व त्यासच लागून असलेल्या पालनपूर, राधनपूर वगैरे संस्थांनांत आणि ह्या राज्याचे कडी जिल्यांत जी एक रबारी ह्मणून गवळ्याची जात आहे ती मूळची द्राविडी दिसते. दक्षिण हिंदुस्थानांत कुरुबार ह्मणून अशीच एक गवळी अगर धनगर यांची जात आहे, आणि रबारी हा शब्द कुरुबार ह्या शब्दाचाच अपभ्रंश दिसतो. त्याचप्रमाणे बंगाल देशाला लागून असलेल्या मगध वगैरे देशाशीं दक्षिण हिंदुस्थानाचे दळणवळण पूर्व किनाऱ्यानें फार होतें, व इकडील राजे लोकांनीं कर्नाटकावर आणि कर्नाटकच्या क्षत्रियांनीं ह्या देशांवर केलेल्या सर्व स्वाऱ्या ह्या पूर्व किनाऱ्याच्या रस्त्यानें ह्मणजे चोलमंडलांतून झालेल्या आहेत. ज्या स्वारींत अतिशय रक्तपात झाल्यानें अशोक सम्राटास पश्चात्ताप होऊन त्याने अहिंसाप्रधान बौद्धधर्म स्वीकारला ती त्याची स्वारी कलिंग देशावर केलेली होती. तैलंगणांतील

गांग वंशीय राजांनीं नेपाळवर स्वारी करून तेथे राज्य स्थापिलें होतें; ही गोष्ट सन १०७९ त घडली. हा संस्थापक नान्यदेव चोलगांग हा होता. ह्याचे मागून त्याच वंशाचे चार पुरुष गादीवर बसले होते. हल्लींची राजधानी काटमांडु येथें, चोल राजांचे वेळींच आणली गेली.

मापें व वजनें.

शुक्राचार्यांनीं हल्लींप्रमाणेंच लांबीची, घनाचीं आणि वजनाचीं अशीं तीन प्रकारचीं मापे सांगितलीं आहेत. इ. स. ११६८ त केलेल्या जमिनीच्या धाराबंदींत व त्या नंतरच्याहि धाराबंदींत जमिनींचे किमान क्षेत्रांचें माप म्हणजे अमुक बीं लावण्यास पुरणारी जमीन असें धरले होतें, आणि बियांच्या वजनाचे कोष्टक खालील प्रमाणें होतें.

तांदुळ, गहूं वगैरे नवधान्यांचा एकेक कण घेऊन त्या नऊ कणांचें जें वजन त्याचे नांव निष्क.

| | | |
|---|---|---|
| १० निष्क | = | फल किंवा नवटक्कु ( महाराष्ट्रामध्यें ७२ टाकांचा शेर धरला जातो व शेराचा आठवा हिस्सा म्हणजे नवटाक ) गुजराथेंतही नवटाक हें वजन प्रसिद्ध आहे. |
| ६४ फल किंवा नवटाक=मण ( म्हणजेच हल्लींचा मण ). | | |
| २० मण | = | कोळ—मराठी कणीग किंवा कणगा कुणगा—हा शब्द कोळग ह्या शब्दाचा अपभ्रंश दिसतो. |
| २० कोळग | = | १ खंडुग (हीच मराठी खंडी व गुजराथी खांडी). |

दक्षिणेंत आजहि इतके बित्रे जमीन किंवा इतके ' मण ' जमीन असे म्हणण्याचा प्रघात आहे. मनुष्याच्या कल्पना परिस्थितीप्रमाणें सारख्याच चाकाऱ्यांत धावत असतात. नऊ धान्यांचा एकेक कण घेऊन त्यांच्या सरासरीच्या वजनावर पुढील मापें रचणें ह्यावरून इंग्रजी ग्रेन शब्दाची व त्यानें दर्शविल्या जाणाऱ्या वजनांची आपणास आठवण होते. निष्क नांवाचे नाणेंहि होतें आणि त्याचें वजन नऊ धान्याच्या कणाएवढें असावें असें वाटतें.

लांबीचीं मापे आपण लहानपणीं शिकलेल्या कोष्टकाप्रमाणें अंगुले, मुष्टि, बाहु, दंड वगैरेचीं असत. सुपारी, नारळी वगैरेचे बाग मोजण्याचे माप वेगळ्या प्रकारचे असे. अठरा पावले लांबीची एक काठी असे, हीस मानदंड अशी संज्ञा असे. एक मानदंड लांब आणि तितकेच रुंद एवढ्या क्षेत्रांत तीन नारळी सुपारीचीं मिश्रित झाडे लावता येतात. अशा एक हजार चौरस क्षेत्रावर राजाचा सात वराह कर असे. वरील क्षेत्रांत उस किंवा द्राक्षे लाविली असल्यास त्याचे उत्पन्नाची किंमत २९ वराह मानली जाऊन राजा त्या रकमेचा $\frac{1}{6}$ धारा म्हणून घेई. दोन चौरस मानदंडांत नुसत्या नारळीचीं दोन झाडें लाविता येतात, आणि अशा हजार चौरस मानदंडाच्या नारळीच्या बागावर दर दहा झाडांस अर्धा निष्क आणि ९ नारळ एवढा कर असे. सोन्या-रुप्याचे वजन, रति म्हणजे गुंजा गद्याण वगैरे तोलांचें असे. नांगरास कानडी शब्द 'कुड' असा आहे. मराठी कुळ शब्द आणि कुळकरणी, कुणबी (गुजराथी कणबी) कुळवणे वगैरे शब्दांतील कुळ शब्द हाच असावा. संस्कृत कुल ( कुटुंब ) शब्दाशीं त्याचा संबंध दिसत नाहीं. काठेवाडांत एका नांगराने पचवीस पासून ४० बिघे पर्यंत जमीन नांगरली जाते असे म्हणतात, आणि तेवढ्या जमिनीस एक सांती जमीन म्हणतात. सांती म्हणजे दोन बैलांचा नांगर. कालिदासाने हिमालयास मानदंडाची उपमा दिलेली आहे. मानदंड ह्या शब्दाचा अर्थ मोजण्याची काठी असा आहे, परंतु कालिदासाने पृथ्वी मोजण्याचा मानदंड असे म्हणून वरील पारिभाषिक अर्थाने तो शब्द वापरला आहे असे वाटते ( स्थितः पृथिव्या इव मानदंडः । कुमार संभव ).

एका राजाचे आमदानीत सर्व दक्षिण हिंदुस्थानभर एकच प्रकारचीं वजनें व मापे करण्याचा प्रयत्नहि झाला होता असे दिसते.

---

# कानडी भाषा.

ग्रंथकार व ग्रंथ ह्या संबंधाने माहिती लिहिण्याचे पूर्वी कर्नाटकी भाषे-संबंधाने दोन शब्द लिहिले पाहिजेत. एक वेळ नर्मदेपर्यंत ही भाषा बोलली जात होती असे कै. लोकमान्य टिळक यांचे मत होते हें प्रसिद्ध आहे; व कानडीची छाप मराठी भाषेवर पुष्कळ असल्या विषयीं अंत्यजोद्धारक रा. विठ्ठल रामजी शिंदे ह्यांनीं दोन्ही भाषांच्या व्याकरण वगैरेवर तुलनात्मक व विद्वत्ताप्रचुर लेख नुकतेच प्रसिद्ध केले आहेत. ह्या विषया-संबंधानें अभ्यास करीत असतां माझीही रा. शिंद्यांसारखीच समजूत झाली आहे, व येथवर दिलेल्या माहितींतहि ठिकठिकाणीं मी मराठी व कानडी शब्दांची तुलना केली आहे.

दक्षिण हिंदुस्थानांत द्राविडोद्भव अशा चार भाषा आहेत, त्या येणें-प्रमाणें:--( १ ) कानडी, ( २ ) तेलगू , ( ३ ) तामीळ व ( ४ ) मल्याळी. ह्या चारी भाषा मुळांत जरी एकाच भाषेपासून निघालेल्या असल्या तरी आज-मितीस त्या एकमेकींपासून इतक्या भिन्न झाल्या आहेत कीं फक्त एक भाषा जाणणारास दुसरी समजत नाहीं. धारवाड, बेळगांव, विजापूर कारवार म्हैसूर वगैरे भागांत कर्नाटकी ह्मणजे कानडी भाषेचा प्रचार आहे. महाराष्ट्रास लागून असलेल्या भागांतील कानडींत मराठीचे मिश्रण झाले असल्यानें तींत कमीपणा आला आहे असे मानण्यांत येते, आणि अगदीं शुद्ध व मधुर असे कानडीचें स्वरूप म्हैसूर राज्यांत दिसते असे एका सुशिक्षित गृहस्थाने मला सांगितलें. तेलंग देशांत थेट पूर्व समुद्रापर्यंत तेलगू भाषा चालते. ह्या भाषेंत संस्कृत शब्दांचा फार भरणा झाला असल्यानें तिचें माधुर्यहि वाढलें आहे असे समजतात. उत्तर हिंदुस्थानांत बहुधा गाण्याचीं पदें, ठुंबऱ्या वगैरे ज्या प्रमाणे हिंदी भाषेंत रचलीं गेलीं आहेत व तींच बहुधां गवयांच्या तोंडून ऐकण्यांत येतात, त्याचप्रमाणे दक्षिण हिंदुस्थानांत भक्तिरसप्रधान पदे तेलंगी भाषेत केलेलीं आहेत, आणि तींच गाण्यांत येतात. पश्चिम किनाऱ्यावरील मलबार वगैरे प्रदेशांत मल्याळी भाषा चालते, तींतही संस्कृत शब्दांचा भरणा फार आहे असे सांगतात. खुद्द मद्रास व त्याच्या दक्षिणेकडील प्रदेशांत तामीळ भाषा चालते. हिंदुच

अरवी असें नांव आहे. ह्या नांवाची व्युत्पत्ति गझेटिअरकाराने चमत्कारिक सांगितलेली आहे. संस्कृतांत "रव" म्हणजे नाद, तो जिला नाहीं ती अरवी कर्णकटु अशी ही व्युत्पत्ति आहे. ती खरी असो किंवा खोटी असो, परंतु ती बोलतांना "ड" "र" वगैरे व्यंजनांवर विशेष जोर देण्यांत येतो, आणि बत्ता आपटला जाणाऱ्या लोखंडी खलांतून निघालेल्या आवाजाप्रमाणें ही कांहींच्या तोंडीं भासते. संस्कृतवरूनच हिच्या नांवाची व्युत्पत्ति बसविणें असेल तर "आरव म्हणजे ओरडणें ह्या शब्दावरून बसविलेली बरी. मदुरेस प्राचीनकाळीं असलेलें विद्यापीठ ह्याच भाषेचें होते आणि ह्या भाषेची ग्रंथसंपत्तिहि दांडगी असून कानडीपेक्षांहि अधिक प्राचीन असें ग्रंथ हिच्यांत आहेत. ह्या भाषेत रचलेल्या भक्तिरसप्रधान स्तोत्रांस वैष्णव पंथांत फारच मान असून त्यास तमीळ वेद म्हणतात. तमीळ भाषेंत 'क, च, ट, त, प' हे वर्ण नाहींत त्यांची जागा 'ख, फ, छ, ठ, थ' ह्या वर्णांनीं घेतली आहे. मद्रासेकडील औषधी वगैरेच्या जाहिरातींत 'भक्ति' च्या बदला 'बक्थि' 'तैलच्या ठिकाणी "थैल" व कन्नडच्या ठिकाणीं "गन्नड" असे शब्द लिहिलेले असतात. क्रॉनिकल वर्तमानपत्रांत ऑगस्ट १९३२ च्या एक दोन अंकांत मद्रासी लोकांच्या ह्या 'h' प्राचुर्याबद्दल एका लेखकानें तक्रार केली आहे आणि ती एक दोन अंकांत आली आहे, त्यावर कोणी मद्रासी गृहस्थानें जबाब देऊन कांहीं वर्मेहि काढले आहे. ही तक्रार करणाऱ्यास तामील भाषेतील वर्णलोपाची कल्पना नसावी असें वाटते.

प्रचलित मराठी व गुजराथी भाषेमध्ये कानडी शब्दांचा भरणा असण्याचे माझ्या समजुतीप्रमाणे कारण असें आहे. सुमारे इ. सनाच्या ९ व्या शतकापासून तो मुसलमानी अंमल सुरू होईपावतो म्हणजे १४ व्या शतकापर्यंत महाराष्ट्रांत व गुजराथेत कदंब, चालुक्य, (दोनदां) कलचुर्य, विजयनगर, यादव वगैरे कानडी राजांचा अंमल राहिला व तो सुमारे ५ शतके टिकला. ह्या काळामध्ये हे कानडी शब्द ह्या दोन्ही भाषांत प्रचारांत व दरबारी लिखाणांत आले असावे. मुसलमानी अंमल सुरू झाल्यावर हल्के हल्के फारशी शब्दांचा प्रवेश होऊं लागला व कानडी शब्दांची प्रगति खुंटली. एक वेळ मुसलमानी शब्दांचा इतका सुळसुळाट

झाला कीं फार प्राचीन राहोत, पण पेशव्यांच्या वेळचीं पत्रें व लिखाणें आज उर्दूचा गंध नसलेल्या मनुष्यास समजण्यास कठीण जातें. मुसलमानी अंमलदार व लोक फारशी आणि आरबी शब्द वापरणार पण आपले लोकहि मुनशीगिरी दाखविण्याकरितां उठल्या बसल्या तसल्या शब्दांचा प्रयोग करीत. नुसतें संध्याकाळीं 'दिवा लावा' असें ह्मणण्याचें ऐवजीं 'चराग रोशन करो' (अर्थात् गुजराथींत) असे ह्मणणारे गृहस्थ माझें पहाण्यांत होते. * नॉर्मन लोकांनीं इंग्लंड जिंकल्यावर तेथेंही फ्रेंच भाषेचा वरचश्मा, फ्रेंच आचारविचार, सॅक्सन लोकांस तुच्छ लेखणें वगैरे गोष्टी विकोपास गेल्या होत्या. जेत्यांच्या भाषेची जित लोकांच्या भाषेवरची ही कुरघोडी एक अर्थी अपरिहार्य असली तरी स्वाभिमानी जित लोकांस ती सहन होत नाहीं ही गोष्टहि तितकीच खरी आहे, व जित लोकांतहि प्रतिकारबुद्धि उदय पावल्याशिवाय रहात नाहीं. छत्रपति शिवाजी महाराजांनीं राज्यव्यवहारकोश करविला त्याच्या मुळाशीं हीच बुद्धि होती व आजमितीसहि सुजाण राजेमहाराजे आणि वाङ्मयसंस्था ह्यांचा स्वभाषेचा ऱ्हास थांबविण्याचे प्रयत्न सुरू आहेत.

लेखन व लीपि.

पंजाबच्या सरहद्दीवरचे अशोकाचे शिलालेख वगळून बाकीच्या त्याच्या शिलालेखांत जी लीपि आहे, तीच कन्नड आणि तेलगु भाषांची लीपि आहे. ही इ. सन पूर्वी २५० वर्षांचे सुमारास हिंदुस्थानांत दाखल झाली असें दिसते. तत्पूर्वीच्या ग्रंथांत लेखनाचा उल्लेख आहे, परंतु त्या वेळचे शिलालेख वगैरे अद्याप सांपडले नाहींत. डॉक्टर बुल्हर ह्यांच्या मते ही अशोक लीपि ब्राह्मी लिपीवरून निघाली आहे आणि ब्राह्मी लीपि मुळची सेमिटिक लोकांची (फिनीशन) होती व ही ब्राह्मी लीपि हिंदुस्थानांत इ. स. पूर्वी ८ वे शतकांत दाखल झाली असेंहि त्यांचें ह्मणणें आहे. 'ब्राह्मी' शब्दाचा संबंध

---

* हिंदुस्थानांत मुसलमानी अंमल सुरू होऊन 'जमा, खर्च, बाकी, जोर, गरज" ह्या सारखे शेंकडो फारशी शब्द रूढ झाले व मराठींत शिरले. ह्या भाषांवर फारशीचा पगडा बसण्यापूर्वी कानडी व संस्कृत शब्दांचा उपयोग राज्यव्यवहारांत व लोकव्यवहारांत होत होता अशी माझी अल्प समजूत आहे.

ब्रह्म ह्मणजे वेद ह्या शब्दाशी असल्यास ही लीपि मुळची येथीलच ठरेल. मागें जात-जात ब्राह्मी लिपीचा संबंध इजिप्तच्या चित्रलिपीशीं ( Hieroglyphics ) जोडतां येतो असें मानतात. पंजाब सुरहद्दीवरील अशोकाचे शिलालेख ज्या लिपींत लिहिले आहेत तीस खरोष्टी लीपि म्हणतात. दक्षिण हिंदुस्थानांत अशोकाचे शिलालेख फक्त एकाच ठिकाणीं आहेत, ( हल्लीं दुसरा एक स्तंभ निजामाचे राज्यांत कोळशाचे खाणीजवळ सांपडला आहे. ) आणि ते म्हैसूर राज्यांत चितळदुर्ग जिल्ह्यांतील मोलकाल्मुरू तालुक्यांत आहेत. हे लेख तीन असून वरील अशोक लिपींतच लिहिले आहेत; परंतु त्यांत एके ठिकाणीं खरोष्टी लिपींत एक शब्द लेखकानें लिहिला आहे. ह्यावरून त्या लेखकास खरोष्टी लिपी अवगत होती किंवा पंजाबचे सरहद्दीवरून ह्या लेखकाची इकडे बदली झाली असावी. ही खरोष्टी लीपि आरबी किंवा फारशी लिपीप्रमाणे उजवीकडून डावीकडे अशी लिहितात. ब्राह्मी, देवनागरीप्रमाणें डावीकडून उजवीकडे अशी लिहिली जाते, ह्या कारणानेंहि सेमेटिक लिपीशीं तिचा संबंध जोडतां येईल असे वाटत नाहीं श्री. गायकवाड ह्यांचे राज्यांतील संखेडा येथें सांपडलेला इ. स. ५९५–५९६ चा लेख व मध्यप्रांतांतील ( Central provinces ) बैतुल येथें सांपडलेला इ. स. ७०८–९ चा लेख हीं नर्मदेचे उत्तरेस देवनागरी लिपींत लिहिलेल्या लेखांचीं पहिलीं उदाहरणें होत. कोल्हापूर राज्यांतील समानगड येथील व वरील संखेड्याचे लेखांत संवत वर्षें दशम पद्धतीने ( एकं, दश वगैरे ) आंकड्यांनी दिलीं आहेत. समानगडचा लेख इ. स. ७५४ चा आहे आणि अंकांच्या उपयोगाच्या लेखांची दक्षिण हिंदुस्थानांतील ( ह्मणजे नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेशांतील ) हीं अगदीं प्राचीन उदाहरणें आहेत. ह्या काळांत लेखनकला ही फार उच्च स्थितीला पोहोंचली होती असें दिसते. इ. स. ११५९ चा एक शिलालेख आहे त्यांत असे लिहिले आहे कीं, त्या लेखाच्या लेखकानें महाभारतांतील संबंध गोग्रहणाचें आख्यान एका तालपत्रावर अतिशय सुवाच्य आणि सुंदर रीतीनें काजळाच्या मशीच्या शाईनें लिहिलें होतें. देवनागरी लिपीवरून मोडी लिपी निघाली असे दाखविणारा निबंध मी लिहिला असून तो या पुस्तकाच्या परिशिष्टांत शेवटीं दिला आहे.

प्राचीनकाळीं टपाल नेण्याआणण्याची व्यवस्था काय होती तें समजण्यास साधन नाहीं. सरकारी टपाल नेण्याआणण्यास सांडणीस्वार, घोडेस्वार, जासूद व अर्वाचीनकाळीं त्यांस कासद हरकारे अशीं नावे पडलीं तशा प्रकारचे पत्रवाहक नेमिलें जात असतील असें वाटतें. सार्वजनिक पत्रें नेण्या आणण्याचे एखादें सरकारी खातें असेल असें वाटत नाहीं. त्यावेळीं मोठमोठ्या शहरांतून सावकार व व्यापारी लोकांचीं पत्रें, माल, हुंड्या व ऐवज नेण्या आणण्याकरितां ते लोक लमाण वगैरे लोकांसारखे खासगी वाहक नेमीत आणि गांवचे लोक आपलीं पत्रें अशा लोकांबरोबर पाठवीत असे दिसते. निकडीचे प्रसंगी पैसा खर्चून जो तो आपला वाहक कामास लावी. अशी पत्रांची ने आण करण्याचा त्यावेळीं एक धंदाच होता आणि पैसे खर्चण्याची ऐपत असल्यास कोणासही असा वाहक मिळे. धनिक लोक गरीबांचे कामास येत. शिवाय आजच्या प्रमाणेंच त्यावेळी खासगी कामाकरितां लोक गाड्यांतून किंवा पायानें दूरचा प्रवास करीत तेहि अशी पत्रे नेत व आजहि ही चाल अगदीं नष्ट झालेली नाहीं. हे लोक संवयीने रोज फार मोठे पल्ले गाठीत. मुक्कामावर पोहोंचल्यावर पायांत उतरलेलें रक्त कमी व्हावे व श्रमपरिहार व्हावा म्हणून ते भिंतीस उंच पाय लावून निजत; असा वाहकांचा धंदा करणारा एक म्हातारा मनुष्य माझे पाहण्यांत आला होता. रक्त फांकण्याकरितां ते गुळाचे सेवन करीत. सुमारे १६१० सालीं म्हैसूरचा राजा चिक्कदेवराय ह्याने आपल्या राज्यांत आंश ( कानडी ) म्हणजे टपाल खाते स्थापिले होते व गुप्त पोलिसांचे कामही त्या खात्याकडेच सोंपविले होते. आजही संशयित मनुष्याच्या पत्रव्यवहारावर ह्या खात्याच्या मदतीनें केव्हां केव्हां देखरेख ठेविली जाते असा लोकांस बळकट संशय आहे व सुधारलेल्या युरोप खंडांतहि ही निंद्य चाल अगदीं अज्ञात नाहीं.

पोस्ट.

प्राचीनकाळचे झालेले गांग, होयशाळ, राष्ट्रकूट, पौर्वात्य गांग आणि विजयनगरचे राजे हे विद्या आणि कला ह्यांचे फारच भोक्ते असत. हे कानडी, तेलगु, तामीळ

साहित्य.

व संस्कृत भाषांत असलेल्या ग्रंथसंपत्तीवरून आणि शिल्प वगैरेच्या कामावरून निर्विवाद सिद्ध होतें. इ. सनाचे तिसऱ्या शतकाच्या सुमारास जैन धर्माचा दक्षिण हिंदुस्थानांत प्रवेश झाला असावा. हे जैन फारच मोठे संस्कृत पंडित असत आणि त्यांनीं संस्कृताप्रमाणेच कानडींतहि अमूल्य ग्रंथांची भर टाकिली आहे. कानडी भाषेस जे इतके उन्नत स्वरूप आहे ते ह्यांच्याच विद्याव्यासंगाचें फळ होय. वैष्णव सांप्रदायांनींहि धार्मिक ग्रंथांची उत्तम भर टाकिली आहे. वैष्णवांचा एक पंथ आहे, त्या पंथाचे लोक वैष्णव मतासंबंधी संस्कृत ग्रंथ वाचीत नाहीत. तामीळ भाषेत वैष्णव मतासंबंधानें जो अत्युत्तम स्तोत्रसंग्रह रचिला गेला आहे त्यास तमीळ वेद म्हणतात, आणि ह्या पंथाचे लोक ह्या तमीळ वेदाचाच मात्र उपयोग करितात. मदुरेस एक विश्वविद्यालयहि फार प्राचीनकाळीं होतें असें वाटते. ह्या विश्वविद्यालयांतील कवींस संगम-कवि म्हणतात. कानडींत भारत, रामायण वगैरे ग्रंथ व प्राचीन सर्व शास्त्रांवर ग्रंथ आहेत आणि त्यांची संख्या फारच मोठी असून त्यांचा वृत्तांत देण्यास स्वतंत्र पुस्तकच लिहिलें पाहिजे. दक्षिण हिंदुस्थान हे संस्कृताचेंहि माहेरघर आहे. वेंकटाध्वरी, माधवाचार्य ( विद्यारण्य ) अप्पैया दीक्षित, गोवर्धनाचार्य, बिल्हण, जगन्नाथराय पंडित ह्यासारखे सर्वमान्य संस्कृत कवि व ग्रंथकार इकडे झाले आहेत; तत्वज्ञानाचा मक्ताहि दक्षिण भूप्रदेशानेंच घेतला होता असे दिसते. दर्शनांचे चारी आचार्य म्हणजे शंकराचार्य, रामानुजाचार्य, मध्वाचार्य आणि वल्लभाचार्य हे सर्व इकडेच झाले आहेत. वस्तुतः पाहिलें असता आर्य आणि द्राविड ह्या दोन संस्कृतींची उत्तर हिंदुस्थानांत गांठ पडून आर्य संस्कृतीची सरशी होऊन द्राविड संस्कृति उत्तरेकडून दक्षिणेकडे जसजशी लोटली जाण्याच्या मार्गास लागली तसतशी उत्तर आणि दक्षिण ह्यांच्यामध्ये एक प्रकारची स्पर्धा लागून कधीं उत्तरेची तर कधीं दक्षिणेची सरशी व्हावी, हा क्रम प्राचीन राजकीय इतिहासांत जसा दिसतो तसा वाङ्मयाच्या इतिहासांतहि दिसतो. वेद आणि उपनिषदें पंचनद देशांत उत्पन्न झाली, तर त्यांच्यावरील भाष्यें व टीका दक्षिणेंत झाल्या. ब्राह्मणी किंवा वैदिक धर्म प्राचीन आर्यावर्तांत म्हणजे विंध्याद्रीच्या उत्तरेकडच्या प्रदेशांत

उत्पन्न झाला असला तरी तो दक्षिणेस दृढमूल झाला. पुन्हां बुद्ध व जैन ह्यांचीं मतें उत्तरेस उत्पन्न होऊन वैदिक धर्मावर जो हल्ला चढविण्यांत आला तोहि कुमारिलभट्ट आणि शंकराचार्यांसारख्या दैवी विभूतींनीं मागे परतवून वैदिक धर्माची पुन्हां संस्थापना केली. मुसलमानी अमलानंतर राजकीय व वाङ्मयात्मक बुद्धीच्या विकासास एक प्रकारें शैथिल्य आले, परंतु सुधारलेलें इंग्रजी राज्य सुरूं झाल्यापासून मर्यादित कां होईना, परंतु कांहीं अशी त्या विकास-क्रियेस गति मिळाली आहे, आणि ह्या विकासाचें अग्रणीत्व एकोणविसाव्या शतकाच्या दुसऱ्या अर्धापासून बंगाल आणि महाराष्ट्राकडे असे; तर तो मनु आजमितीस पालटला असून आज सर्व हिंदुस्थानाचें अग्रणीत्व मद्रासेकडे आलें आहे. सर्व इलाख्यांत आपल्या तेजानें, बुद्धीच्या प्रखरतेनें, राजकीय शहाणपणानें आणि चिकाटीनें मद्रासेकडील लोकच पुढे आलेले असून ते नेतील तिकडे हिंदुस्थान चाललें आहे. हा सर्व इतिहास मनोरंजक असला तरी येथे देणे शक्य नाही. येथे फक्त प्राचीन राजांनीं स्वत: ज्या मान्य ग्रंथांची निर्मिति केली किंवा कांहीं श्रेष्ठ विभूतींस आश्रय दिला त्याचा अगदी संक्षिप्त अशा रीतीने नामनिर्देश करण्याचें योजिले आहे. दुर्विनीत गांग ह्या राजाने किरातार्जुनीय या काव्यावर टीका लिहिली आहे. त्याचा गुरु जैनाचार्य पूज्यपाद हा प्रसिद्ध व्याकरणकर्ता होता. श्रीपुरुष नांवाच्या दुसऱ्या गांग राजाने " गजशास्त्र " नांवाचा ग्रंथ लिहिला असून त्यांत हत्ती सबधी माहिती दिली आहे. त्याचा पुत्र शिवमार गांग ह्याने " गजाष्टक " नांवाचा ग्रंथ लिहून आपल्या पित्याने संग्रहित केलेल्या माहितीत भर टाकिली आहे. नृपतुंग उर्फ अमोघवर्ष नांवाच्या राष्ट्रकूट राजाचा गुरु प्रसिद्ध जिनसेनाचार्य हा होता, त्यानें आदि पुराण नांवाचा जैन ग्रंथ लिहिला आहे. स्वत: अमोघवर्ष हा कन्नड भाषेचा अत्यंत चाहता व भोक्ता होता असें दिसतें. कविराजमार्ग ह्या नांवाचा साहित्यशास्त्रावरील कन्नड ग्रंथ फार प्रसिद्ध आहे, तो ह्या अमोघवर्ष राजाने लिहिला आहे. त्यानें कर्नाटक देशाची आणि कन्नड देशाची अशी प्रशस्ति केली आहे की " कावेरी आणि गोदावरी ह्या नद्यांमधील प्रदेश अत्यंत सुंदर असून ह्याच्या तोडीचा दुसरा प्रदेश जगांत नाहीं. ह्या प्रदेशांत कन्नड भाषा बोलतात. ती फार सुंदर आणि मधुर असून तिच्या

बरोबरीची भाषा जगांत नाहीं." ह्या राजाचे राज्य इ. स. ८१९ पासून ८७७ पर्यंत होतें. विक्रमादित्य चालुक्य हा इ. स. १०७६ त गादीवर आला. हा राजा चालुक्य वंशांत जे अनेक पराक्रमी राजे झाले त्यांतही श्रेष्ठ असा होता. ह्याच राजाचे पदरी प्रसिद्ध संस्कृत कवि बिल्हण हा होता, आणि "विक्रमांक-देवचरित" नावाचा बिल्हणाने लिहिलेला ग्रंथ हें त्याच्या आश्रयदात्याचे चरित्र होय. ह्या राजानेंच शकांचा शक मागे टाकून चालुक्यांचा विक्रम शक सुरू केला, आणि चालुक्यांचे राज्य होते तोंपर्यंत हा शक चालू होता. मिताक्षरा नामक हिंदुधर्म शास्त्रावरील प्रसिद्ध ग्रंथाचा कर्ता, आज निजामशाहींत एक खेडे ह्मणून असलेल्या, पण एक वेळ राजधानी ह्मणून अति प्रसिद्धीस पावलेल्या कल्याण नामक शहरीं ह्याच राजाचे अमदानींत झाला. विज्ञानेश्वराने ह्मटले आहे कीं, विक्रम चालुक्यासारखा राजा पूर्वी झाला नाहीं आणि पुढेही होणार नाहीं. ह्या विक्रमादित्याच्या मुलाचे नाव भूलोकमल्ल असे होते. त्यास सर्वज्ञ अशी पदवि मिळाली होती आणि त्याने मानसोल्लास नांवाचा संस्कृतांत ग्रंथ लिहिलेला असून त्यात राजनीतीविषयीं आणि राजांच्या करमणुकी-विषयीं वगैरे कथन आहे. विज्जल नांवाचा कलचुर्य किंवा कालाभ्र (काळभोर) वंशांत राजा झाला. त्याची कारकीर्द इ. स. ११५१ पासून ११८२ पर्यंत होती. त्याची राजधानी वरील कल्याण शहर होतें. ह्याच राजाचे आमदानींत कल्याण येथें लिंगायत धर्माचा संस्थापक बसव हा झाला. विज्जलाक नांवाचें एक जैन काव्य ह्या राजासंबधाने लिहिलें आहे. होयशळ वंशांतील प्रसिद्ध राजा बिट्टीदेव ह्याची कारकीर्द इ. स. ११०४ पासून ११४१ पर्यंत होती. प्रसिद्ध दर्शनकार व "श्रीवैष्णव" नामक भागवत संप्रदायाचे संस्थापक रामानुजाचार्य हे ह्याच राजाच्या कारकिर्दीत झाले. त्यांचा जन्म पूर्व किनाऱ्यावर चोल राज्यात झाला होता. चोल राजे हे शैव होते आणि त्यांचे व रामानुजाचार्यांचें न पटल्यानें आचार्यांनीं आपला देश सोडिला आणि ते बिट्टीदेवाच्या आश्रयास येऊन राहिले. बिट्टीदेव हा मूळचा जैन पंथाचा होता, परंतु रामानुजाचार्यांस गुरु करून त्यानें वैष्णव पंथाची दीक्षा घेतली व आपलें बिट्टीदेव हे नांव बदलून

विष्णुवर्धन हें नांव धारण केलें. रामानुजाचार्यांनीं स्थापन केलेलें आद्यपीठ त्रिचनापल्लीनजिक कावेरीचे तिरावर श्रीरंगम् येथे आहे. विजयनगरचे साम्राज्य इ. स. १३३६ पासून १६६४ पर्यंत होतें. विजयनगर राजधानीची स्थापना रामायणांतील प्रसिद्ध नगरी जी किष्किंधा तिचे जागेवर करण्यांत आली होती. हे शहर तुंगभद्रेचे तिरावर वसविलें होतें. हे, विजयनगर-साम्राज्याचा आद्य संस्थापक राजा हुक्क उर्फ हरिहर ( व त्याचा भाऊ बुक्क ) ह्यांनीं प्रसिद्ध माधवाचार्य मंत्री ह्यांचे सहाय्यानें वसविले होते. माधवाचार्य हे तत्कालीन संस्कृत विद्येचे अधिष्ठानभूत होते. हेच संन्यासग्रहण केल्यानंतर विद्यारण्य हे प्रसिद्ध नांव धारण करते झाले. आद्य शंकराचार्य झाले नसते तर त्यांची जागा विद्यारण्यांनीं घेतली असती असे गुरूवर्य डॉ. भांडारकर ह्मणत असत. श्रृंगेरीच्या शंकराचार्यांच्या पीठावरही ह्यांची स्थापना झाली होती. विजयानगर स्थापण्याचे कामी हरिहरास माधवाचार्यांची मदत होती. ह्या उपकृतीची अल्प फेड व आपल्या राजधानीस भूषण ह्मणून तिचे मुळचें नांव विद्यानगर असे ठेवण्यांत आले होते. ह्याचेंच पुढे विजयनगर असे अपभ्रंशाने नांव झालें असे ह्मणतात. ह्या राजधानीचे कन्नड नांव आणेगुंडी असें होतें. त्या भाषेत आणे हा हस्तिवाचक शब्द आहे, आणि त्यावरून हस्तिनापुर नांवाच्या महाभारतांतील प्रसिद्ध पांडवांच्या राजधानी-चाहि निर्देश होतो. ह्या माधवाचार्यांचे तत्कालीन न्याय, व्याकरण, वेदांत वगैरे सर्व शास्त्रांवर मान्य असे ग्रंथ आहेत. वेदांतावरील पंचदशी हा ग्रंथ आजच्या वेदांताच्या पुनरुज्जीवनाच्या काळी सर्वांच्या तोंडी झाला आहे.

**जगन्नाथराय कवि**

विजयनगरचा सम्राट् कृष्णराय हा त्या राज्यांतील अत्यंत पराक्रमी राजा होता. हा आपले पदरीं मोठमोठे कवि आणि पंडित बाळगीत असून संस्कृत व तैलगी ह्या दोन्ही भाषांचा तो परामर्श घेत असे. ह्याचे पदरी मुख्य आठ कवि होते, त्यांस अष्ट दिग्गज ह्मणत. ह्या कवींचे शिरोमणी प्रसिद्ध अप्पैय्या दीक्षित होतें. संस्कृतांतील प्रसिद्ध कवि जगन्नाथराय ह्यांचे चरित्रावर ह्या कारणाने बराच प्रकाश पडतो असें मला वाटतें. जगन्नाथराय हे मूळचे

तैलंग ब्राह्मण होते असे त्यांनीच स्वमुखाने सांगितले आहे. ( तैलगान्वय मंगलालय ) आणि वास्तविक त्यांस विजयनगरसारख्या हिंदूच्या साम्राज्यांत स्वदेशांत आश्रय मिळण्यासारखी त्यांची योग्यता होती असें असून तो त्यांस न मिळून आश्रयाकरितां आणि उदर-भरणाकरितां त्यांस दिल्लीधरावल्लभाकडे धांव घ्यावी लागली होती ह्याचे कारण काय तें कळत नाहीं, तथापि प्रत्यक्ष अथवा परंपरेने त्यांस अप्पैया दीक्षित आणि त्यांच्या यूथांतील दिग्गज कारण असावेत व त्यामुळें चिडून जात्या उद्दाम असलेले जगन्नाथराय अधिक उद्दाम बनले असावे असा संशय येतो. रसगंगाधरांत जगन्नाथरायांनीं कुवलयानंदकार दिक्षितांचीं मते खोडून काढतांना त्यांना " लंबकर्णस्य द्रविडस्य उक्तिरियम् " अशा शेलक्या अपशब्दांनीं दिक्षीतांची संभावना केली आहे. जगन्नाथास दुसऱ्या कवींस करीची उपमा देऊन स्वतःकडे केसरीची उपमा घेण्याची फार आवड असे. एकदां केसरी वर्तमानपत्राचे मथाळ्यावर असलेला " स्थितिनो रे दध्याः क्षणमपि मंदाधे क्षण सखे । गजश्रेणीनाथ त्वमिह जटिलायां वनभुवि । असौ कुंभिभ्रांत्या खरनखरविद्रावितमहा गुरुग्रावग्रामः स्वपिति गिरिगर्भे हरिपतिः ॥ हा श्लोक सर्वांच्या वाचण्यांत आला असेलच; तसेच भामिनीविलासाचे आरंभीचा श्लोक " दिगंते श्रूयंते मदमलिन-गंडा. करटिनः । करिण्यः कारुण्यास्पदमसम शीलाः खलु मृगा' । इदानी लोकेऽस्मिन्ननुपमशिखानां पुनरयम् । नखानां पांडित्यं प्रकटयतु कस्मिन् मृगपतिः ॥ १ ॥ हा वरील अष्टदिग्गज आणि त्या गजश्रेणीचे नाथ अप्पैया दीक्षित ह्यांस उद्देशून लिहिला असून दिग्गज ह्या संज्ञेवरून त्यांस सुचला असावा असे वाटते. आपले मनोरथ पूर्ण करण्यास दिल्लीश्वर किंवा जगदीश्वर हे दोनच समर्थ असून इतर राजानीं केलेली संभावना आपल्या मीठ-मिरचीसहि पुरणार नाहीं असे इतर राजांच्या देणगीविषयीं धिक्कारयुक्त उद्गार त्याने काढिले आहेत. अप्पैयादीक्षितांनीं केलेल्या कुवलयानंद नामक अलंकारावरील प्रसिद्ध ग्रंथांत अलंकार वगैरेंचीं उदाहरणे दुसऱ्या कवींच्या काव्यांतून घेतलीं आहेत. पंडितरायाने आपल्या रसगंगाधर नामक ग्रंथांत स्वतःच नवीन उदाहरणे रचून घातलीं आहेत व दीक्षितांस टोमणा मारण्याकरितां

म्हटलें आहे कीं ' निर्माय नूतनमुदाहरणानुरूपं काव्यं मयात्र निहितं न परस्य किंचित् । किं सेव्यते सुमनसांमनसापिगंधः कस्तूरिका जननशक्ति भृता मृगेण ॥ अशी माझी समजूत आहे; तथापि या स्पर्धेमुळें त्यांचा एकमेकांविषयीं आदर मात्र कमी झाला नव्हता असें दिसतें. स्वतःकडे मृगपतित्व घेतलें आहे तरी दीक्षितांस मदमलिनगंड अशा करीची उपमा देण्यास पंडितराय विसरले नाहींत. अप्पैया दीक्षित विश्वेशाचे दर्शनार्थ काशीस गेले असतां जगन्नाथ पंडितांचे भेटीस गेले, तेव्हां पंडित निजले आहेत असें त्यांस सांगण्यांत आलें; तेव्हां " किं निःशंकं शेषे शेषे वयसि समागतो मृत्युः । असे उद्गार त्यांचे तोंडून निघाले; परंतु लागलीच " अथवा चिरं शयीथाः नूनं जागर्ति जाह्नवी जननी । असें त्यांनीं आपले समाधान करून घेतले. हे उद्गार पंडितांच्या प्रसिद्ध गंगालहरी काव्यास उद्देशून आहेत हें चाणाक्षांस सांगणे नकोच. वृद्धावस्थेंत पंडित काशीस जाऊन राहिले होते असे त्यांनीं स्वमुखानेंच सांगितलें आहे. कृष्णरायाचा काल इ. स. १५०८ पासून १५२९ पर्यंत होता.

देवागिरीच्या यादवांच्या पदरीं हेमाद्रिपत उर्फ हेमाडपंत नांवाचा पंडित होऊन गेला. त्यानें आपल्या व्रतखंड नांवाच्या ग्रथांत देवगिरी शहर वसविणार भिल्लमदेव यादव होता असे लिहिले आहे. हा पंडित एके काळीं प्रसिद्ध मुत्सद्दी म्हणून नांवाजला गेला असावा. कोणत्याहि अवाढव्य कामास महाराष्ट्रांत हेमाडपंती म्हणतात, तसेच मोडी लीपिहि यानेच सुरू केल्याची आख्यायिका आहे, परंतु ह्या आख्यायिकेत तथ्य नाही हे निराळे सांगणे नको. हा विषय पुरा करण्यापूर्वी श्रृंगेरीपिठाचे संस्थापक व त्रिखंडविख्यात तत्ववेत्ते जगद्गुरु शंकराचार्यांचा उल्लेख केला पाहिजे. ह्यांचें प्रस्थानत्रयीवरील भाष्य प्रसिद्धच आहे. ह्यांनी केलेला स्तोत्रग्रंथ मोठा आहे. केसरींत एकदां ह्या स्तोत्रसंग्रहासंबंधाने ह्मटले होते की, तो लोण्यापेक्षाहि मऊ आणि खडीसाखरेपेक्षांहि गोड आहे. संस्कृत भाषेत तत्वज्ञानासारख्या अति गहन विषयावर थोडक्यांत व मुद्देसुद रीतीनें गद्यांत लिहिण्याचें कामांत आचार्यांचा हातखंडा असून त्यांची बरोबरी संस्कृत वाङ्मयांत कोणींहि करूं शकणार नाहीं असे मोठमोठे तत्वज्ञ पंडित

म्हटलें आहे कीं 'निर्माय नूतनमुदाहरणानुरूपं काव्यं मयात्र निहितं न परस्य किंचित् । किं सेव्यते सुमनसांमनसापिगंधः कस्तूरिका जननशक्ति भृता मृगेण ॥ अशी माझी समजूत आहे; तथापि या स्पर्धेमुळें त्यांचा एकमेकांविषयीं आदर मात्र कमी झाला नव्हता असें दिसतें. स्वतःकडे मृगपतित्व घेतलें आहे तरी दीक्षितांस मदमलिनगंड अशा करीची उपमा देण्यास पंडितराय विसरले नाहींत. अप्पैया दीक्षित विश्वेशाचे दर्शनार्थ काशीस गेले असतां जगन्नाथ पंडितांचे भेटीस गेले, तेव्हां पंडित निजले आहेत असें त्यांस सांगण्यांत आलें; तेव्हां "किं निःशंकं शेषे शेषे वयसि समागतो मृत्युः । असे उद्गार त्यांचे तोंडून निघाले; परंतु लागलीच "अथवा चिरं शयीथाः नूनं जागर्ति जाह्नवी जननी । असें त्यांनीं आपले समाधान करून घेतले. हे उद्गार पंडितांच्या प्रसिद्ध गंगालहरी काव्यास उद्देशून आहेत हें चाणाक्षांस सांगणे नकोच. वृद्धावस्थेंत पंडित काशीस जाऊन राहिले होते असें त्यांनीं स्वमुखानेंच सांगितलें आहे. कृष्णरायाचा काल इ. स. १५०८ पासून १५२९ पर्यंत होता.

देवागिरीच्या यादवांच्या पदरीं हेमाद्रिपंत उर्फ हेमाडपंत नांवाचा पंडित होऊन गेला. त्यानें आपल्या व्रतखंड नांवाच्या ग्रंथांत देवगिरी शहर वसविणार भिल्लमदेव यादव होता असे लिहिले आहे. हा पंडित एके काळीं प्रसिद्ध मुत्सद्दी म्हणून नांवाजला गेला असावा. कोणत्याहि अवाढव्य कामास महाराष्ट्रांत हेमाडपंती म्हणतात, तसेच मोडी लीपिहि यानेच सुरू केल्याची आख्यायिका आहे, परंतु ह्या आख्यायिकेंत तथ्य नाहीं हें निराळें सांगणें नको. हा विषय पुरा करण्यापूर्वी शृंगेरीपिठाचे संस्थापक व त्रिखंडविख्यात तत्ववेत्ते जगद्गुरु शंकराचार्यांचा उल्लेख केला पाहिजे. ह्यांचें प्रस्थानत्रयीवरील भाष्य प्रसिद्धच आहे. ह्यांनी केलेला स्तोत्रग्रंथ मोठा आहे. केसरींत एकदां ह्या स्तोत्रसंग्रहासंबंधाने ह्मटले होते की, तो लोण्यापेक्षांहि मऊ आणि खडीसाखरेपेक्षांहि गोड आहे. संस्कृत भाषेंत तत्वज्ञानासारख्या अति गहन विषयावर थोडक्यांत व मुद्देसुद रीतीनें गद्यांत लिहिण्याचें कामांत आचार्यांचा हातखंडा असून त्यांची बरोबरी संस्कृत वाङ्मयांत कोणीहि करूं शकणार नाहीं असें मोठमोठे तत्वज्ञ पंडित

(पौर्वात्य व पाश्चात्य अशा दोन्ही प्रकारचे) एक कंठरवानें म्हणतात. हा लोकोत्तर पुरुष इ. स. ७३७ त जन्मला आणि इ. स. ७६९ त आपल्या वयाच्या फक्त ३२ वें वर्षी एवढे लोकोत्तर कार्य करून व दिग्विजय मिळवून समाधिस्थ झाला.

---

## कानडी भाषेसंबंधानें थोडीशी माहिती.

कर्णाटक किंवा कर्णाट ह्या शब्दाची व्युत्पत्ति अद्याप बसली नाहीं. कृष्ण म्हणजे काळया जमिनीचा मुलुख; शातकर्णी ह्या नांवाप्रमाणेंच कर्ण–कर्णी म्हणून कोणी राजा प्राचीनकाळीं झाला असावा आणि त्याच्या नांवावरूनच हे नांव ह्या देशास लागले असावे अशा प्रकारच्या सुचना पुढें आल्या आहेत. कानांत घुमणारी (कर्ण अटति) म्हणजे मधुर अशीहि व्युत्पत्ति कित्येक लावतात. सुमारे २०० वर्षांपूर्वी झालेल्या विश्वगुणादर्श नामक ग्रंथात ही व्युत्पत्ति सांगितली आहे. Col. Meadows Taylor हि हिला the Sweet musical Kanase असें म्हणतो. त्या शब्दांतील "नाट" हा शब्द कोंकनाट शब्दांतलि नाटाप्रमाणें "नाड" म्हणजे देश ह्या शब्दाचा अपभ्रंश असावा असे फार सभवतें. कानडींत पोपट वाचक शब्द कन्नडवक्की असा आहे. त्याच पक्ष्याचे दुसरे नांव पंडित-वक्की असेंही आहे, व त्यावरून कन्नड म्हणजे पांडित्याची भाषा अशा अर्थाचा भास होतो. प्राचीन ग्रंथांत कानडी भाषेचे दोन प्रकार सांगितले आहेत. एक पळेगन्नड किंवा हळेगन्नड म्हणजे प्राचीन–जुनी–कानडी आणि दुसरा पोसगन्नड किंवा होसगन्नड म्हणजे अर्वाचीन कन्नड. प्राचीन तेलगू किंवा मल्याळी आणि अर्वाचीन तेलगू व मल्याळी ह्या भाषांत संस्कृत शब्दांचा भरणा किंवा अभाव अशामुळें भेद पडला आहे, परंतु कन्नड भाषेची तशी स्थिती नाहीं. प्राचीन व अर्वाचीन कानडींत विभक्तींचे वगैरे प्रत्यय बदलले आहेत आणि म्हणून फरक पडला आहे. कानडींतील प्राचीन ग्रंथकार कानडी संस्कृत शब्दाचे समास करण्याच्या विरुद्ध असत. अमोघवर्ष (नृपतुंग) राष्ट्रकूट राजानें आपल्या प्रसिद्ध काविराजमार्ग नामक अलंकारा-

वरील ग्रंथांत अशा समासांस वृद्ध–तरुणी विवाहाची उपमा दिलेली आहे. न्यायसेन नामक ग्रंथकाराने ह्या मिश्रणास तूप व तेलाचें ह्मणजे अमंगळ मिश्रण ह्मटलें आहे, व नागवर्मा नामक ग्रंथकारानें त्यांस मोत्याच्या माळेंत रुद्राक्ष घालण्यासारखें आहे असें ह्मटलें आहे. मराठी वैय्याकरण अशा समासांच्या विरुद्ध आहेत. ह्या कन्नड भाषेची उन्नति जैन ग्रंथकारांनीं व राष्ट्रकुट राजांनीं फार केली हें वर सांगितलेंच आहे. कानडीस बेळुगन्नड म्हणजे शुभ्रकानडी, तेळुगन्नड ह्मणजे स्वच्छ कानडी, अशींहि दुसरीं नांवें आहेत. अच्छगन्नड ह्मणजे एखाद्या झऱ्यांतून निघणाऱ्या शुद्ध प्रवाहासारखी हें नांवहि वारंवार लावलेलें आढळतें.

आर्यांची आणि द्रविडांची नवीनच गांठ पडल्याचे वेळीं कानडी किंवा द्राविड भाषा अविकसित स्थितींत असून मनांतील विचार विशद रीतीनें मांडण्याचें काम तिला झेंपत नसावे.व ह्या गोष्टीची आर्यलोक कुचाळी करीत असावे असें दिसतें; परंतु द्रविड लोकांनीं, आर्य भाषेचा अभ्यास करून आपली भाषाहि उन्नतीस आणिली, आणि ह्या गोष्टीचें तत्कालीन श्रेष्ठ आर्य कौतुकहि करीत असत असे दिसते. रामायणांत मारुतीस " पदवाक्य प्रमाणज्ञ " असें विशेषण लाविलें आहे आणि त्याचा अर्थ न्याय, मीमांसा, व्याकरण वगैरे शास्त्रांत प्रवीण, असा आहे, व पुढें त्याचा एक विशेष म्हणून असें सांगितले आहे कीं तो " न म्लेच्छति " ह्मणजे बोलण्यांत विचाराचा घोंटाळा करीत नाहीं; तर आपले विचार विशद रीतीनें मांडतो. निरनिराळ्या दोन भाषा बोलणाऱ्या व एकमेकाशेजारीं असलेल्या प्रांतांत एकमेकांच्या भाषेच्या विशेषाविषयीं आणि चालीरीतीविषयीं केंव्हां केंव्हां अनादर, निदान परिहास करणे हें नेहमींच्या अनुभवांतलें आहे. मराठींत द्राविडी प्राणायाम, हेगाडा (हेग्गड) कोंगाड्या ( कोंगु जातीचा ) वगैरे शब्द ह्या थट्टेचे द्योतक आहेत. इंग्रज लोक आयरिशांच्या बोलण्याची अशीच टर उडवितात. कुत्र्याचे पाय मांजरास लाविलेले असे रूपक ( mixed metaphor ) आयरिश लोकांच्या बोलण्यांत येतें त्यास आयरिश बुल्स् किंवा घोडचुका ह्मणतात व असले रूपक करणें हें विचाराच्या घोटाळ्याचें दर्शक आहे अशी इंग्रजांची समजूत आहे. कानडी भाषा

उन्नत स्थितीस पोहोंचल्यावर मूळचा गरीब परंतु पुढें श्रीमंति आलेला मनुष्य आपणास जशीं श्रीमंत, रावसाहेब वगैरे विशेषणें आपल्याच हातानें लावून घेतो किंवा दुसऱ्यानें लाविल्यास खूष होतो, त्याचप्रमाणें कांहीं अंशीं कानडीस शुभ्र, विशद, अच्छा वगैरे विशेषणें लावणाऱ्यांच्या मनाची स्थिती असावी असें वाटतें.

---

## धर्म.

हिंदु अथवा वैदिक धर्माचे इकडे मुख्य दोन भेद आहेत. शैव आणि वैष्णव. वैष्णवांचे पोटभेद (१) श्रीवैष्णव, (२) माध्व, (३) स्मार्त वगैरे आहेत. वरील धर्मांशिवाय इतर धर्म ह्मणजे (१) जैन, (२) बौद्ध, (३) लिंगायत व (४) खिस्ती हे होत. ह्या धर्मांचा अगदीं त्रोटक इतिहास असा आहे:–

**शैव**:–ह्या संबधाने फारसे लिहिण्यासारखें नाहीं, वैष्णव आणि हा पंथ ह्यांत फार विरोध आहे; आणि ते विरुद्ध देवताचीं नांवें सुद्धां तोंडानें उच्चारीत नाहींत असे ह्मणतात. शैव पंथाचे ६३ ग्रंथकार झाले आहेत.

**श्रीवैष्णव**:—हा पंथ श्रीरामानुजाचार्यांनी (इ. स. ११०४–४१) त स्थापिला. हे आचार्य फार जाडे विद्वान आणि सुधारक होते. ह्यांचें प्रस्थानत्रयीवरील भाष्य श्रीशंकराचार्यांच्या भाष्यापेक्षांहि अधिक विद्वत्ता-प्रचुर आहे असे ह्मणतात. हे मूळचे चोलमंडलम् ह्मणजे पूर्व किनाऱ्यावर राहणारे, परंतु तेथील चोल राजे शैव असल्याने त्यांनीं आचार्यांचा छळ केला व त्यामुळे ते होयशळ राजाचे आश्रयास येऊन राहिले. होयशळांतील एक अत्यंत पराक्रमी राजा विष्णुवर्धन ह्याने सदर आचार्यांपासून श्रीवैष्णव धर्माची दिक्षा घेतली व तत्प्रीत्यर्थ आपले मूळचे बिट्टीदेव हें नांव बदलून विष्णुवर्धन हे नांव धारण केले हे वर सांगितलेच आहे. ह्या आचार्यांनीं जैनांचा छळ केला होता असें ह्मणतात. ह्यांचें आद्यपीठ त्रिचनापल्लीजवळ श्रीरंगम् येथें आहे. येथील देऊळ हें हिंदुस्थानांतील अत्यंत विस्तृत आणि सुंदर देवळांपैकीं एक आहे. ते कावेरीच्या तिरावर आहे, ह्या स्थानास दक्षिणकाशी ह्मणतात. सर्व आय्यंगार ब्राह्मण हे ह्या पंथाचे असतात.

**स्मार्त** :—हा पंथ श्री शंकराचार्यांनीं स्थापन केला. ह्यांत पंचायत-नाची पूजा असते. मुख्य स्थान पूजकाच्या मर्जीप्रमाणें शिव, विष्णु, गणपती वगैरेंस दिलेलें असते. सर्व आय्यर जातीचे ब्राह्मण स्मार्त असतात.

**माध्व**:—हा वैष्णव पंथाचा पोटभेद मध्वाचार्यांनीं स्थापन केला आहे. हे आचार्य फार विद्वान होते आणि त्यांनींहि प्रस्थानत्रयीवर भाष्य लिहिलें आहे. हे द्वैतमतवादी आहेत. ह्यांचे आदिपीठ उडुपी येथे मंगळूरानजीक आहे. सर्व राव म्हणविणारे ब्राह्मण हा पंथ पाळितात. ह्या आचार्यांचा जन्म इ. स. ११९९ त दक्षिण कानड्यांत झाला व वयाचे ७९ वें वर्षी ते मृत्यु पावले.

वैदिक उर्फ ब्राह्मणी धर्म ह्या प्रदेशांतील पश्चिम भागांत त्रिमेत्रकदब राजाने इ. स. चे तिसरे शतकांत आणिला व पूर्वेकडील पल्लव राजाने ह्याच सुमारास तो तेथें सुरू केला असे म्हणतात. इ. स. चे दुसरे शतकांत ब्राह्मणांस दिलेलीं दानपत्रे सांपडली आहेत त्यांवरून वरील विधानास बाध येतो आणि स्वतः कदंब राजे हे मूळचे ब्राह्मण होते असेही म्हणतात. बौद्ध आणि जैन धर्मापुढे वैदिक धर्माचा कांही काल टिकाव लागला नाही, परंतु श्रीशंकराचार्य, कुमारिलभट्ट वगैरे महापंडितांच्या प्रयत्नाने त्याचा पराभव होऊन बौद्ध धर्मास स्वतःच्या जन्मभूमीस अंतरावे लागले. रामानुजाचार्यांचे उपदेशाने विष्णु-वर्धन होयशळनें वैष्णव धर्माची दीक्षा घेतल्यानंतर दक्षिणेंतील जैन धर्मा-सहि उतरती कळा लागली; तथापि अद्याप इकडे जैनांची संख्या मोठी असून बौद्ध धर्माप्रमाणें त्याची अवस्था झाली नाही. हा धर्म इ. स. पूर्वी ३ ऱ्या शतक्यांत इकडे आला असें मानतात. जैनांचे असें म्हणणे आहे कीं, मौर्य साम्राज्याचा संस्थापक चन्द्रगुप्त हा जैनधर्मी होता. वानप्रस्था-श्रम घेऊन तो आपला गुरु भद्रबाहु बरोबर दक्षिण हिंदुस्थानांत एकटाच आला होता व भद्रबाहु हा पुन्नाट देशांत जात असतां श्रवणबेलगोळा येथें वारल्यावर चन्द्रगुप्तहि मृत्युवश झाला. ह्या कथेस इतिहासांत कांहीं पुष्टि नाहीं. चन्द्रगुप्त नांवाचा कोणी एखादा अप्रसिद्ध राजा कोंकणांत असलेल्या अनेक व लहान मौर्य राजांतला असावा असा अजमास आहे.

जैन धर्माचा आद्य संस्थापक पार्श्वनाथ हा इक्ष्वाकु कुलाचा होता, तो इ. स. पूर्वी ८ वे शतकांत झाला; ह्या धर्माची पुन्हां स्थापना किंवा जीर्णोद्धार करणारा वर्धमान हाहि इक्ष्वांकु कुळांतील असून बुद्धापूर्वी अगदींच थोड्या कालांत झाला होता.

**बौद्ध:**–बुद्ध हा इ. स. पूर्वी ४७७–८० ह्या वर्षी जन्मास आला व आपले वयाचे ८० वें वर्षी वारला. ह्याच्या लेखांचा व तोंडीं उपदेशांचा संग्रह मगध देशाचा राजा अजातशत्रु ह्यानें बुद्धाच्या मृत्युनंतर करविला होता. चन्द्रगुप्त मौर्याचा नातू प्रसिद्ध अशोकसम्राट् ह्या धर्माचा होता, आणि त्याने ह्या धर्माचा प्रसार फार केला; तो इतका की एक वेळ सर्व हिंदुस्थानाने तो स्वीकारला; येवढेच नव्हे तर तो ब्रह्मदेश, चीन, जपान, जावा वगैरे द्वीपें व द्विपकल्पे आणि सिंहलद्वीप येथेहि पसरला होता. खुद्द अशोकाचा मुलगा महेन्द्र आणि मुलगी संघमिता हे धर्माचा प्रसार करण्याकरितां हिंदुस्थानाबाहेर गेले होते. अशोकाने ह्या धर्माच्या तत्वांचा सार्वत्रिक प्रसार होण्यासाठी तीं तत्वे गोवलेले एकदर १४ लेख मोठमोठ्या शिलांवर खोदवून ठेविले आहेत. अलीकडे आणखीहि असे कांही लेख सांपडले आहेत. दक्षिण हिंदुस्थानांत अशोक स्तभ फक्त एकाच ठिकाणीं आहे असे वर लिहिलें आहे. येथें तीन जवळच परंतु निरनिराळ्या ठिकाणी कोरलेले स्तभलेख आहेत. मौर्य आणि चोल राजांच्या अमलांत ह्या बौद्ध धर्माचा प्रवेश दक्षिण हिंदुस्थानांत झाला; म्हणजे इ. स. पूर्वी ३ रे शतकापासून इ. स. चे सहावे शतकापर्यंत. इ. स. चे आठवे शतकापासून त्यास उतरती कळा लागून हल्लीं तो ह्या प्रदेशात नामशेष झाला आहे. बुद्ध धर्माच्या आद्यग्रथास त्रिपीटक असें नांव आहे. त्याचे ( १ ) सूत्र ( २ ) विनय व ( ३ ) अभिधर्म असे तीन भाग असून त्यांत अनुक्रमे ( १ ) बुद्धांचीं वचने ( २ ) आचार आणि ( ३ ) तत्वज्ञान सांगितले आहे. बौद्धांची तिसरी धर्ममहासभा अशोकाचे वेळीं इ. स. पूर्वी २४६ वे वर्षी झाली होती, आणि चवथी व शेवटची काश्मीरचा राजा कनिष्क ह्याने इ. स. चे पहिल्या शतकांत भरविली होती. सर्वभूतांविषयीं दया हें ह्या धर्माचे मुख्य आणि महत्वाचें तत्त्व आहे. ह्या

धर्माच्या पांच मुख्य आज्ञा आहेत त्या अशा:-( १ ) अहिंसा ( २ ) अस्तेय ( ३ ) सत्य ( ४ ) अव्यभिचार आणि ( ५ ) मादक पदार्थांचा निषेध.

**लिंगायत :**—हा धर्म कलचुर्य राजाचे अमलांत कल्याण येथें बसव नांवाच्या ब्राह्मणानें स्थापिला. ह्यांत शिवाची आराधना सांगितली आहे. बौद्ध आणि जैन धर्मांप्रमाणेंच ह्या धर्मासहि वेदांचें प्रामाण्य कबूल नाहीं; तसेंच ब्राह्मणांचें श्रेष्ठत्वहि त्यास मान्य नाहीं. वर्णाश्रमधर्म आणि तीर्थव्रतें ह्यांचाहि ह्या धर्मांत निषेध सांगितला आहे.

**ख्रिस्ती धर्म:**—हा इ. स. चे १ ल्या शतकांत मलबार किनाऱ्यावर सेंट थॉमस ह्यानें आणिला असें मानण्यांत येतें. ख्रिस्ती मिशनऱ्यांस रोमचे संन्याशी ह्मणत व एतद्देशीय राजांकडून त्यांस कांहीं इनामे व जहागिरीहि मिळाल्याचें शिलालेखांत आढळून येते. ( कोईमतूरनजीक सांपडलेलें सन १७०४ चें दानपत्र पहा. )

---

## आचार व दानव्रतादिकांचे प्रकार.

**धंद्यापरत्वें ब्राह्मणांचे भेद**:-ब्राह्मणांचें लौकिक व वैदिक असे भेद आहेत. पहिले नोकऱ्या चाकऱ्या वगैरे करितात, दुसरे उपाध्यायपण करितात. धंदा ह्मणून शिव, विष्णू वगैरे देवतांची पूजा करणाऱ्यांस एक प्रकारचें पातित्य येते आणि त्यांशीं इतर ब्राह्मण भोजन वगैरे व्यवहार करीत नाहींत.

**मासांची गणती:**— उत्तर हिंदुस्थानांत हल्लीं पूर्णिमांत मास आहे, तसाच ह्या प्रदेशांतहि पूर्वी होता; परंतु पुढें आमांत मास लोक मानूं लागले. ह्या नव्या प्रकाराचें अगदीं पहिलें उदाहरण पैठण येथील इ. स. ७९४ चें दानपत्र होय.

**क्षत्रियांचें उपनयन:**—इ. स. १२५४ त होयशळ राजा नरसिंह ३ रा ह्यानें आपलें उपनयन वयाचे १५ वे वर्षी केलें, आणि त्यावेळीं त्यानें दानें दिल्याचीं दानपत्रें आहेत. ह्यांस सर्वज्ञ अशी पदवी मिळाली होती.

**अंगुष्ठ-कर्तन:**---कृषिकारांचा एक पोटभेद आहे त्या लोकांत एक विलक्षण चाल आहे; तीस कानडींत 'बेरळ कोडुव' किंवा अंगुष्ठकर्तन म्हणतात. लग्नाची वेळ समीप आली असता मुलीचे कान टोचण्यापूर्वी तिची आई आपल्या हाताची तर्जनी आणि कनिष्ठिका हीं बोटें कापून टाकीत असे. ही क्रूर चाल सरकारनें बंद केली आहे, तेव्हां आतां ही क्रिया करण्याचे वेळीं त्या दोन बोटावर अंगुस्तान घालून जणूं बोटें कापलीं असें दाखवितात. खानदेशांतहि पूर्वी ही चाल असावी असे दिसतें. एका लग्न होऊं घातलेल्या मुलीच्या आईला एक खानदेशी सोनार थट्टेने म्हणाला कीं मुलीचे लग्न फुकट नाही, बोट कापून द्यावें लागेल.

**कुवाडें:**--इकडे शूद्रामध्ये एक जात आहे, तींत प्रसूतीनंतर नवरा बाजेवर पडून राहून सर्व प्रसूतीचे उपचार घेतो असे म्हणतात, ह्यास कुवाडे म्हणतात. अशीच चाल पोमला नांवाची जात गुजराथेंत आहे तिच्यांतही आहे असे म्हणतात.

**वारांवरून नांवें:**--वीरबल्लाळ होयशळ ( इ. स. ११८० ) राजाचा जन्म शनिवारीं झाला होता म्हणून त्याचे टोपण नांव 'शनिवारसिद्धि' असे होतें. महाराष्ट्रात हा प्रघात नाही, परतु गुजराथेत शनीयो, सोमा, शकी ( मुलीचे नाव ) वगैरे नावे फार प्रचारांत आहेत.

**सति.**--सतीची चाल इकडे बरीच असावी, कारण तिच्या स्मरणार्थ उभे केलेले दगड पुष्कळ पाहण्यांत येतात; त्याचप्रमाणे लढाईंत मेलेल्यांच्या नावानेहि दगड उभे करण्याची चाल इकडे पुष्कळ आहे. त्यांत गांवच्या गाई चोरून नेल्या जात असतां लढून त्या परत आणण्यांत मृत्यु आला म्हणूनहि कांहीं दगड उभे केलेले आढळतात. ह्यावरून महाभारतांतील गोग्रहणाची आठवण होते. वीरांच्या नावानें उभ्या केलेल्या दगडांस विरकळ म्हणतात. कधीं कधीं ह्या विरकळांवर अतिशय सुंदर नकाशी खोदलेली असते. ह्या विरकळाचे तीन भाग केलेले असतात; अगदीं तळच्या भागांत किंवा तक्त्यांत ज्या लढाईंत त्या विरास मरण आलें तिचा देखावा काढला असतो, मधल्या तक्त्यांत अप्सरा वगैरेनीं परिवेष्टित असा तो

वीर विमानांत बसून स्वर्गास जात आहे असे दाखविलें असतें. शेवटच्या तक्त्यांत तो ईश्वरासन्निध बसून सामीप्य-मुक्तिसुखाचा अनुभव घेत आहे असें दाखविलें असतें. क्वचित् ह्या तीन तक्त्यांत राहिलेल्या खुल्या जागेत मरणाराचे नांव वगैरे इतिहास दिलेला असतो. सतीच्या दगडांत फक्त ती जगास आशीर्वाद देत आहे असें दाखविले असतें. महाराष्ट्रांत सतीचे दगड आहेत. गुजराथेंत सति आणि वीर या दोघांचेही दगड पुष्कळ गांवोगांव आहेत. हे बहुधा गांवाबाहेर पाणवठ्या शेजारींच असतात. वीरांच्या दगडावर घोड्याचे चित्र कोरलेलें असतें. कानडींत 'कळ' म्हणजे दगड.

**पुरुष-सति:**-स्त्रिया ज्याप्रमाणें पति-निधनानंतर पतीच्या शवाबरोबर आपला देहहि अग्नीस अर्पण करून सति जात असत अशी चाल प्रसिद्ध आहे, त्याचप्रमाणे इकडे मृत राजाबरोबर त्याचे स्नेही किंवा प्रीतीची माणसें आपला देह अर्पण करीत अशी विलक्षण चाल आढळून येते. वीरबल्लाळ होयशळ राजा इ. स. १२२० त वारला, त्याबरोबर त्याचा सेनापति व नजीकचा चुलत भाऊ कुमार लक्ष्मण बल्लाळदेव ह्याने आत्महत्या करून घेतली, त्याबद्दल बेलूर येथील देवळांत त्याच्या स्मारकाचा मोठा दगड उभा केलेला आहे, त्यावर लढणाऱ्या वीरांचीं चित्रें हातांत तलवारी घेऊन एकमेकांचा वध करीत आहेत असे दाखविले आहे. लक्ष्मणाने आपल्या स्त्रीसह हें सतीचे कृत्य केले, त्याबद्दल त्याच्या राजनिष्ठेची वगैरे अतिशय प्रशस्ति केलेली आहे. शिवाय इकडे सूर्यग्रहणाचे पर्वणिनिमित्त अग्निकाष्ठे भक्षण करून मरण्याची, ( Epigraphica India in No. 226 D. 1180 ) तसेंच पर्वणीच्या प्रसंगीं हत्तीच्या पायांखाली पडून किंवा "गंडार दावणी" असें ओरडत आत्महत्या करण्याचीहि चाल होती. लढाईंत मोठा विजय मिळविला ह्मणजे वाजत गाजत समारंभाने आपल्या पूर्वजांच्या थडग्यापाशीं जाऊन त्यांस ती सुवार्ता जाहिर करण्याची चाल जपानांत आहे. रूसो-जपानी लढाईंत जपानास जें अद्भुत यश मिळाले ते बादशाहाचे पूर्वजांस जाहिर करण्याचे दिवशीं राजनिष्ठेच्या भरांत एका जपानी सेनापतीनें आत्महत्या केली होती व तिचा वर्तमानपत्रांत बराच गवगवा झाला होता. इजिप्तमध्यें तुतनखामेन राजाचें सुमारे ३००० वर्षांपूर्वीचे थडगे उकरण्यांत

आले असून त्यांत त्या राजाबरोबर जिवंत पुरलेल्या नोकरचाकरांचीं अस्थि-पंजर सांपडले त्यांची चित्रे इंग्लंडच्या पत्रांतून आलीं होतीं. रानटी लोकांतहि मृताबरोबर त्याचा आवडता कुत्रा, हत्यारें वगैरे पुरण्याची चाल होती. ह्या सर्व यत्नांचा हेतु हा दिसतो की, मृतास त्या बरोबर सहगमन करणारे आप्तेष्ट, नोकरचाकर, हत्यारे वगैरे उपयोगी पडावीं. ही चाल प्राचीनकाळीं सर्व लोकांत होती असे दिसते. हिंदु लोकांत. उत्तरक्रियेत मृतास महामार्गात उपयोगी पडावे ह्मणून दीप, यष्टि वगैरेचीं दाने केलीं जातात. ख्रिस्ती, मुसलमान वगैरेच्या पवित्र शास्त्रांत सांगितले आहे की, प्रलयानंतरच्या न्यायाच्या दिवशी ईश्वर सर्व मृतांस हांक मारील, त्यावेळीं देहांपासून वेगळे झालेले जीवात्मे त्याच्या देहांत प्रवेश करून आपल्या पुण्यपापाची झडती देण्यास ईश्वरासमोर उभे राहतील. मुसलमानांत दांत वगैरे मृत्यूपूर्वी देहांपासून निराळे झालेले अवयव जपून ठेवून मृताचे शवाबरोबर पुरण्यांत येतात असे समजते.

आणखी एका प्रकारच्या स्मारकासंबंधाने दोन शब्द लिहिले पाहिजेत. इकडे तीन बाजूस भिंतीप्रमाणे तीन बिन घडलेले दगड उभे करून सर्वांवर एक छपराप्रमाणे दगड ठेवून थडगे केलेले असते, त्याची उंची १॥–२ फुटापेक्षा जास्त नसते; ह्यांस तिकडे पाडुकोळी ह्मणतात. हीं थडगीं कुरुवार ह्मणजे धनगर उर्फ रबारी, गवळी वगैरे पशुपाळ लोकांनीं केलेलीं असतात. ह्यांत मृताच्या अस्थि पुरलेल्या सांपडतात; त्याबरोबरच मातीचीं मडकीं, माळा वगैरेही पुरलेल्या असतात. अशा प्रकारची थडगी करण्याची चाल एक वेळ सार्वत्रिक होती आणि युरोपांतहि ती आढळून आली आहे असें दिसते. इंग्रजींत ह्यास डॉलमेन् ( Dolmen ) किंवा सिस्ट ( Cist ) असे म्हणतात. गॅझेटिअरकार म्हणतात की, पाडुकोळी हा शब्द फ्रेंच असावा; कारण इकडे प्राचीन काळात आलेले फ्रेंच मिशनरी ह्या दगडास “ Pierre pandue ” “ पियर पांदु ” असे म्हणत असत, व एका फ्रेंच कवितेचा उताराहि त्यानी दिला आहे. पाडु शब्दाची कदाचित् अशी व्यवस्था लागेल, परंतु कोळी शब्दाची व्यवस्था काय ? वडोदे जिल्ह्यास लागून दोन “ मेवास ” म्हणजे कोळी लोकांच्या वस्तीचे प्रदेश आहेत.

एक संखेडा मेवास आणि दुसरा पांडु मेवास; आणि पांडु मेवास म्हणजे पांडुकोळी जातीच्या लोकांचा मेवास असे मला वाटते. म्हैसूर प्रांतांत असलेल्या ह्या थडग्यांस बडगे जातीचे लोक मोर्यारमाणे म्हणजे मौर्यांचे घर असे म्हणतात; यावरून वरील कल्पनेस पुष्टि मिळते. पुण्याजवळ भोसरी व मोशी गांवचे माळावर असेच पुष्कळ दगड आहेत व तेथून जवळच गोळापूर वगैरे धनगरांचीं गांवें आहेत.

**गायक व नर्तकी:**–इकडे देवळांत गायक व नर्तकी देवाच्या शुश्रूषेसाठी ठेवण्याची चाल आहे. ही चाल गोवें, बेळगांव, धारवाडापर्यंत असून खंडोबा नांवाचे दैवतामागून ती महाराष्ट्रांतहि अल्प प्रमाणांत शिरली आहे. महाराष्ट्रांत ह्या स्त्रीसेवकांस मुरळी आणि पुरुषास वाघ्या म्हणतात. दक्षिण हिंदुस्थानांत ह्या नर्तकीच्या देवदासी, लोकबालिका, नायकसानी वगैरे पोटभेद आहेत. त्या स्त्रिया अविवाहित राहतात; पुरुष ह्या स्त्रियाबरोबर साथ करितात. महाराष्ट्रांतील मुरळ्यांची चाल सरकारनें बंद केली आहे. दक्षिण हिंदुस्थानांत देवाची पालखी, वरात वगैरे मिरवणूकीमध्यें ह्या गायक नर्तकांचा मोठा ताफा बरोबर ठेवून मिरवणूक चालत असतां त्यांजकडून गायन व नृत्य करविण्याची लोकांस फार हौस आहे.

**दान-व्रतें वगैरेंचे प्रकार:**–देवांस पूजा, नैवेद्य, भोग, अभ्यंग वगैरेसाठीं, वेदपठनासाठी वगैरे केलेल्या दानांचे पुष्कळ शिलालेख आणि दानपत्रें फार प्राचीन काळापासूनचीं आहेत; तसेच सूर्यग्रहण, चन्द्रग्रहण व इतर मोठी पर्वें ह्यांचे प्रसंगीं केलेल्या दानाचीहि पत्रें आहेत. रामेश्वर, काशी, वगैरे क्षेत्रांत सदावर्तें आणि अन्नछत्रें चालविण्याकरितां दानपत्रें केलेलीं आहेत; तसेंच एक देवाण्णा पिल्ले नांवाचा प्राचीनकाळीं प्रसिद्ध वैद्य होऊन गेला होता, त्यास राजाकडून व इतरांकडून केलेली दानपत्रें सांपडलीं आहेत ह्यांत वैद्य मजकुराच्या नवीन वैद्यशास्त्रपद्धतीकरिता ही बक्षिसें त्यास दिल्याचें म्हटले आहे. हे नवीन शास्त्र कोणते त्याचा स्पष्ट उल्लेख नाही. ह्या काळीं मलबार वगैरे समुद्रकांठच्या प्रांताचा इराण आणि अरबस्थानाशीं व्यापार होता असे मागे सांगितलेच आहे. कदाचित् तिकडे जाऊन त्या वैद्यानें युनानी वैद्यकाची माहिती आणली असल्याचा संभव आहे. गज-

शास्त्रावर प्राविण्य मिळविण्याबद्दलहि " जैतु " नांवाच्या गजवैद्यास बक्षिसपत्र करून दिलेलें सांपडलें आहे.

---

## खेळ.

महाराष्ट्रांतील इटीदांडूचा खेळ दक्षिण हिंदुस्थानातून घेतला आहे हें निर्विवाद आहे, कारण वखट, लेंड वगैरे टोल्याचीं नांवे तेलंगी एक, दोन ह्या अंकाचीं सात पर्यंतचीं आहेत. झकु म्हणजे सात. सागरगोट्याचा मुलींचा खेळहि तिकडीलच दिसतो. इ. स. ११७८ तील एका शिलालेखांत एका राजाने मिळविलेल्या विजयास सागरगोट्याच्या खेळाची उपमा दिली आहे. ह्या खेळाचे कानडी नांव "अण्णेकळ तिरिकल" आहे. हा खेळ खेळतांना मुली हर्प्पा घालतात आणि "हरपन्नाचो" असा शब्द उच्चारतात. हे कानडीच शब्द असले पाहिजेत, शिवाय कारस्काऱ्याचा खेळहि कानडीच आहे असें स्पष्ट दिसतें.

---

## यक्षगान.

उत्तर हिंदुस्थानांत रामलीला नांवाचे खेळ करण्याची फार चाल आहे, ह्यांत राम सीता वगैरे पात्रे सजून रामायणांतील निरनिराळ्या कथानकांचे नाटकासारखे दृश्य करून दाखवितात. दक्षिण हिंदुस्थानांतहि यक्षगान नांवाचा असाच खेळ करण्याची चाल असून ह्याप्रसंगीं गीतें गाण्याची चाल आहे. वैष्णवाच्या देवळांतून राधाकृष्णाच्या लीला, सोंगें घेऊन करून दाखविणारा एक वर्ग उत्तर हिंदुस्थानांत आहे, त्यास " कत्थक " म्हणतात. दोन लहान मुलांपैकीं एक डोक्यावर मयूरपिच्छ वगैरे धारण केलेला व गोपवेष असलेला कृष्ण बनतो व एक राधेसारखा वेष घेतो, आणि नंतर हे गाणीं म्हणून भिक्षा मागत फिरतात. आगगाडींतहि अशीं मुले गाणीं म्हणून पैसे उकळतात.

---

## कलाकौशल्य आणि शिल्प.

**शिल्प:**–ह्या विषेत पुढील गोष्टींचा समावेश करून त्यासंबंधी थोड-थोडी माहिती दिली आहे.

( १ ) शिलालेख कोरणें, ( २ ) मूर्ति करणे व ( ३ ) देवळें.

**शिलालेख:**–हे लेख सुमारे इ. स. ३ ऱ्या शतकापासून म्हणजे कदंब राजांचे वेळेपासून आढळले आहेत, परतु ते अगदीं ओबडधोबड असे आहेत. ही कला होयशळ राजाचे वेळी म्हणजे इ. स. चे ११ वे शतकांत पूर्णावस्थेस पोहोंचली होती. ह्या वेळच्या शिलालेखावरील कोरलेली अक्षरें सुंदर असून भाषेच्या आणि वाङ्मयाच्या दृष्टीनेहि त्यांची उत्तमांत गणति आहे. कांही शिलालेख कानडी आणि संस्कृत अशा दोन्ही भाषांत आहेत. कांही केवळ गद्यात्मक तर कांहीं गद्यपद्यात्मक आहेत.

---

## पुतळें व मूर्ति.

दक्षिण हिंदुस्थानांत किंबहुना सर्व हिंदुस्थानांत अतिशय प्रसिद्ध असलेला पुतळा म्हणजे म्हैसूरचे राज्यांत श्रवणबेलगोळा येथील श्रवणाप्पा उर्फ गोमटेश्वराचा पुतळा होय. हा इ. स. ९८३ त उभा करण्यांत आला. हा एकच दगडातून कोरलेला असून त्याची उंची ५१ फूट आहे. मांड्याच्या वरचा भाग अगदीं मोकळा आहे, व त्यास कांहीं आधार नाही. हा अगदी नग्न आहे, व त्याची चर्या गंभीर अशी दाखविली आहे. हा पुतळा एका खडकाचे डोंगराचे माथ्यावर आहे; ह्याचे बरोबरीचा उचीचा दगडाचा पुतळा जगांत नाही. ह्याचे खालोखाल आणखी दोन पुतळे आहेत, एक पुण्याजवळील कार्ल्याच्या लेण्यांत आहे. त्याची उंची ४१ फू. ५ इं. असून तो इ. स. १४३१ त उभा केला गेला आहे; दुसरा येनूर येथे इ. स. १६०३ त उभा करण्यांत आला, ह्याची उंची ३७ फूट आहे. ऱ्होडस बेटावरील कलॉसस नांवाच्या सूर्याच्या प्रतिमेची उंची १०३ फूट होती, परंतु ती प्रतिमा पंचधातूची ( Bronze ची ) होती. जर्मनींत १८७० साली उभा केलेला हर-

मानचा पुतळा ७० फूट उंच आहे, तोहि धातूचा आहे. गोमटेश्वराचा पुतळा जैनांचा आहे. ह्या नांवाचा कोणी जैन राजा होता किंवा साधू होता हे कळत नाहीं. ह्याशिवाय इकडील सर्व प्रसिद्ध देवालयांत खांबांवर, भिंतींवर असंख्य मूर्ति खोदल्या आहेत त्यांत माणसे, पशु, पक्षी ह्या सर्वांचे आकार आहेत. माणसांचे आकार व भाव सजीवपणांत असतात तसे दाखविले आहेत.

---

## देवळें व शिल्प पद्धति.

इकडील हिंदु देवळाच्या दोन पद्धति ( Styles ) मानल्या आहेत. (१) द्राविड, (२) चालुक्य शिवाय तिसरी जैन पद्धतिहि आहे. दुसऱ्या पद्धतीची देवळे साधारणतः गोदावरीच्या उगमापासून पूर्वेस महानदीचे मुखापर्यंत आणि दक्षिणेस कावेरी नदीपासून कृष्णेच्या मुखापर्यंतच्या प्रदेशांत आहेत, तेथून दक्षिणेस द्राविड पद्धतीचीं देवळे आहेत. चालुक्य राज्य कांहीं दिवस नष्ट झालें होतें त्या काळांत द्राविड पद्धतीने उत्तरेस शिरकाव केला होता. वेरूळच्या लेण्यापैकीं प्रसिद्ध कैलास नांवाचें देऊळ हे ह्या द्राविड पद्धतीचा उत्कृष्ट नमुना आहे. कैलासचे लेणे इ. स. चे ८ वें शतकांत कृष्णराज राष्ट्रकूट राजाचे अमलांत कोरले गेले आहे.

**चालुक्य वगैरे पद्धतीचे भेदः**—जैन आणि द्राविड ह्या दोन्ही पद्धतींत मुख्य देवळापुढे ४ खांबी मंडप केलेला असतो, आणि त्यास भागाचे चार कोपऱ्यांत ४ खांब उभे केलेले असतात; परतु जैन पद्धतींत एक पांचवा खांब मध्यावर उभा केलेला असतो आणि तो वरून असा तोलून धरलेला असतो की त्यास तळाशीं कांहीं आधार लागत नाहीं आणि त्या खालून हातरुमाल काढून घेतां येतो. जैन पद्धतीत देवळापुढील हे स्तंभ अतिशय सुंदर असतात, कधीं कधीं त्यांची उंची ५० फुटाइतकी असते व ह्या स्तंभाचे खोड ( Stem ) पैलू वगैरेत, असंख्य प्रकार व अद्भुत नकशीचें कोरीव काम असते. हिंदूंच्या देवळांपुढील हे स्तभ म्हणजे दीपमाळा असतात. बुद्ध पद्धतीत ह्या स्तभावर एकाद्या साधूची मूर्ति किंवा कांहीं चिन्ह बसविलेले असते.

द्राविड पद्धतीच्या देवळाचे मुख्य ४ भाग असतात. (१) गोपुर म्हणजे प्रवेशद्वारावर शंकुच्या आकृतीचे रचलेले मनोरे, (२) विमान म्हणजे ज्यांत मुख्य मूर्ति बसविलेली असते तो गाभारा, (३) मंडप—विमानाचे द्वारांत जाण्याची वाट झाकणारा देवळाचा भाग, (४) छत्र्या किंवा स्तंभप्रचुर बैठकी. ह्याशिवाय देवळाचे आवारांत तळीं, विहिरी व राहण्याकरितां जागा बांधलेल्या असतात.

चालुक्य पद्धतींत छप्पर पायऱ्या पायऱ्यांचें केलेलें असतें. विमानाचे पायाचा आकार पैलूदार असतो व प्रवेश द्वारावर अति उंची कोरीव काम केलेलें असते. खांब बहुधा जोडखांब असतात, आणि त्यांच्या आकृति अनेक प्रकारच्या असतात. ह्या देवळांतून खिडक्यांत बसविलेले कोरीव दगडांचे काम अतिशय मनोहर असते. होयशळ राजांचे अमदानींत ही चालुक्य पद्धति उच्चतम स्थितीस पोहोंचली होती. हाळेबीड, बेलूर आणि सोमनाथपुर येथील देवळे ही ह्या पद्धतीचीं उत्तमोत्तम उदाहरणे होत. हाळेबिड येथील होयशळेश्वराचे देऊळ विनयादित्य होयशळाचे आमदानींत ( इ. स. १०९१ ते ११०० ) बांधले आहे. केदारेश्वराचे देऊळ सुमारें इ. स. १२१९ त वीर बल्लाळ होयशळ आणि त्याची महाराणी अभिनव केतलदेवी ह्यांनीं बांधिलें आहे. जैन धर्माचा त्याग केल्यानंतर विष्णुवर्धन होयशळ राजाने बेलूर येथील चन्नकेशव उर्फ विजय नारायणाचे देऊळ इ. स. ११११ त बांधिलें आहे. फरग्युसन नामक प्रसिद्ध आंग्ल शिल्पशास्त्रज्ञाचे असे म्हणणे आहे कीं, केदारेश्वराचे देऊळ म्हणजे एक शिल्परत्न आहे. हिंदु शिल्पाच्या कैवाऱ्याने ह्या देवळाकडे बोट दाखवून स्वस्थ राहावें. ह्या देवळाशीं स्पर्धा करणारें दुसरें देऊळच नाहीं. त्यांचे असेहि म्हणणे आहे कीं, युरोपांतील गॉथिक नांवाच्या शिल्पापेक्षां हाळेबीड येथील शिल्पकाम श्रेष्ठ आहे, आणि गॉथिक कलेनें जे करण्याचा प्रयत्न केला परतु साधले नाहीं, ते ह्या देवळांत करून दाखविलें आहे. बेलूर येथील चन्नकेशवाच्या देवळांत वर सांगितलेल्या प्रकारच्या २८ खिडक्या आहेत. त्यांतील नकशीचे अनत प्रकार आणि सौंदर्य असें आहे कीं तें पाहून मन थक्क होते. येथेच देवळाचे भितीवर एका नर्तकीची मूर्ति खोदली आहे. तिचे हातांत एक फळ दाखविले आहे आणि त्या फळावर

एक बसलेली माशी दाखविली आहे. ही माशी सर्वांगपरिपूर्ण आणि इतकी सुंदर आहे कीं, ती जिवंत असावी असा भास होतो. ह्या देवळाचे भिंतीचे पैलूवर जितकें नकशीचे खोदीव काम आहे आणि त्यास जितके परिश्रम लागले असतील, तितकी नकशी आणि परिश्रम तितक्याच क्षेत्र-फळाच्या ( Surface ) जगातील कोणत्याही इमारतींत सांपडणार नाहींत. फरग्युसनच्या मतांपैकी एक दोन वाक्ये खालीं उतरून घेतलीं आहेत;–

" There are many buildings in India which are unsurpassed for delicacy of detail by any in the world. But the temples at Beloor & Halebid surpass even these for freedom of handling & richness of fancy "........ ... ...; he has at some length compared the Hoyshaleshvar temple to the Pantheon at Athens & in some respects given the palm to the former.

वर सांगितलेल्या देवळाशिवाय तिरुपति, श्रीरंगम्, तंजावर, मदुरा, रामेश्वर वगैरे अनेक देवळें येथें मोठीं भव्य आणि नक्षीकाम केलेलीं आहेत की, तीं पाहून मन थक्क होऊन जाते व त्यांचे वर्णन करण्यास शब्द पुरत नाहीत.

---

## चित्रपट व चित्रें.

जेथे शिल्पकला इतक्या पूर्णतेस पोहोचली होती तेथे इतर कला मागासलेल्या असण्याचा संभव नाहीं, कारण विद्यांच्या आणि कलांच्या वृद्धींत एक प्रकारचे साहचर्य दिसते. इ. स. ११३९ चा एक शिलालेख आहे, त्यांत कपडे शिवणाऱ्या शिंपी लोकांनी कांहीं मालावर सरकारास कर देण्याचे कबूल केले आहे. निरनिराळ्या रंगाचे सुताचे व रेशमी तुकडे जोडून चित्रपट तयार करण्याचे कामांत ते कुशल होते असे दिसतें. त्याचें वर्णन असे केले आहे की " वस्त्रखंडितश्रृंगारचित्रोद्भव, अनेकवस्त्रखंडित श्रृंगारविद्याप्रवीणा "

आजिंठ्याच्या लेण्यांतील बुद्धनिर्वाण, इराणच्या वकिलाच्या सन्मानार्थ भरलेला दरबार वगैरे रंगित चित्रे ह्या कलेच्या उन्नतस्थितीची आज साक्ष देत आहेत.

वर लिहिल्याप्रमाणे दक्षिण हिंदुस्थानासंबंधानें महत्वाच्या विषयांवर संक्षिप्त माहिती दिली आहे. ह्या सर्व बाबतींवर पुष्कळ लिहिण्यासारखे आहे, परंतु विस्तारभयास्तव येथेंच पुरे करितो.



## *Corrections for the English portion.*

| Page. | Line. From Top. | Line. From Bottom | Incorrect. | Correct. |
|---|---|---|---|---|
| 81 | 1 | . | Nripaturga | Nripatunga |
| 92 | 13 | . | a Basava | on |
| 110 | | 6 | Thrre | There |
| 112 | | 9 | of those Brahmns | Those of Brahmns |
| 112 | | 5 | aré Parabhoo | Arè Parabhoo |
| 113 | 4 | | गोपराष्ठ | गोपराष्ट्र |
| 114 | | 14 | Prapu | Prabhu |
| 114 | | 10 | Patane Prabhos | Patane Prabhoos |
| 114 | | 7 | Waters | Writers' |
| 115 | 3 | | Narso | Narasa |
| 117 | 1 | . | Brahmns | Brahmans. |
| 117 | 11 | | Gungikar | Gunjikar |
| 118 | ... | 9 | shamboa | shanboa or shenboa |
| 121 | 2 | . . | ah | Râh |
| 123 | 3 | . . | ssys | says |

| Page. | Line. From Top. | Line. From Bottom. | Incorrect. | Correct. |
|---|---|---|---|---|
| 123 | 9 | ... | cultivatihn | cultivation |
| 133 | ... | 4 | thir | their |
| 136 | 10 | ... | माणिकं | मणिकं |
| 136 | ... | 2 | गडा | गंडा |
| 139 | 1 | ... | कड्ड | कड्डे |
| 141 | 8 | ... | sandle | sandal. |
| 142 | 9 | ... | Pursved | Pursued. |
| 146 | ... | 14 | Ghatt | Ghat |
| 146 | ... | 8 | From | For |
| 147 | 9 | ... | mean | means |
| 151 | 6 | ... | नाडगौड | नाडगौडा |
| 158 | ... | 2 | Genoolojical | Geneological |
| 166 | ... | 2 | Come | came |
| 167 | 1 | ... | marathas | Marathas. |
| 174 | 5 | ... | Vali | Valli |

# The Poet Jagannath Pandit.

Krishnarai was one of the most famous and powerful kings on the throne of the farfamed Empire of Vijayanagar. He ruled from 1508 to 1529. His dominion extended from Sashti on the west to cuttack on the East Coast Barbossa the Portuguese traveller had visited Vijayanagar during the reign of this great king and he has recorded his opinion that at that date there was no Capital, even in Europe, that could equal Vijayanagar not excepting even Rome. This powerful king was also a great patron of learning. He had at his court poets who were called the *Ashta Diggajas* or the eight elephants that, in mythology guard the 8 directions. The Chief of these 8 poets was Appa-Ayya Dikshit a great poet, Vedantist and Alankarik author of Kuvalayanand a work on Alankâra and—a treatise on Vedanta. This *Appaiya* was the contemporary of Jagannatha who was an Andhra or Telang i e , a subject of Vijayanagar (*Jagannath* has said about himeslf तैलंगान्वय. He naturally must have sought patronage at that court But it seems he was disappointed and Appa-Ayya Dikshit probably had some hand direct or indirect, in this disappointment or at least the Pandit must have suspected it Pandit Jagannatha never forgave the Dikshit for this insult Jagannath consequently had to seek patronage at the Court of Delhi.

I think the Pandit has a fling both at the Dikshit and the Vijayanagar Court in Bhamini Vilasa in the verse

विद्वांसो वसुधातले परवच: श्लाघासु वाचयमा: ॥
भूपाला: कमलाविलासमदिरोन्मीलन् मदाघूर्णिता: ॥
आस्येधास्यतिकस्य लास्यमधुना. .वाचां विपा को मम ॥

The Pandit also occasionally compared other poets to elephants and himself to a lion (*a*) स्थिति नोरे दध्या: क्षणमपि मदांधेक्षण सखे । गजश्रेणीनाथ त्वमिहजटिलाया वनभुवि ॥ (*b*) दिगते श्रूयंते मदमलिनगंडा: करटिन:। करिण्य. कारूण्यास्पदमसमशीला: खलु मृगा । इदानीं लोकेस्मिन्ननुपमशिखानांपुनरयं । नखानां पांडित्य प्रकटयतु कस्मिन्मृगपति: ॥ The word *Panditya* in this verse seems to refer to himself for his well known nick name is *Pandit*. He has also openly and by name attacked the opinions of the Dikshit stated in his Kuvalayananda At the Court of Delhi...he seems to have married a Mohamedan damsel or may have simply been her lover. Any how, he seems to have been a very devoted lover. The lady seems to have predeceased the Pandit, and he has given expressiom to the excruciating wrench of his heart in his *Karunarasa* in the *Bhaminivilasa*. Even his famous *Anyoktis* seem to be a challenge to the Dikshit. आ मूलाद्रत्न सानोर्मलय वलयितादाच........... वाचा माचार्यतायाः पदमनुभवितुं कोस्ति धन्योमदन्यः Here the Pandit tells the Vijayanagar court that it is not the Dikshit, but himself that is fit to be the leader of the *Diggajas* of his court. Jagannatha however seems, in his last days to have sincerely repented of his unorthodox and irregular ways of life and passed his oldage at Benares, where he composed a most melodious hymn which has passed into a religious hymn called *Gangalahari* or the waves of the Ganges. A great soul as he was, his greatness does not leave him even in his moment of penance and he has warned

the mother Ganges that she must arm herself well; for she has to purify and redeem by no means a mean sinner ( बधान द्रागेव.......जगन्नाथस्यायं सुरधुनि समुध्दार–समयः ||. Even his apparent pride seems to have been inspired by this his rivalry with the Dikshit whose hatred seems to have become a ruling passion of his life.

It is remarkable that Bhavabhooti who, if at all, stands second to Kalidas only, also seems to have been the victim of misfortune in his early career. But he has relied upon the wide world and endless time for appreciation of his merit–कालोत्ह्यायं निरवधिर्विपुलाच पृथ्वी ||



## SOME EPISODES OF MAHABHARAT.

Many of the episodes in Mahabharat are supposed by the people of the south to have taken place in that part of the country. For example the Banavashi District in Karwar is supposed to be the place where the 5 Pandavas passed their days of exile, hence the name of the country.

MANIPUR where Arjun had gone and married a Naga-damsel is located by the southerners in the south, whereas the present small state of Manipoor is supposed to be the ancient Manipoor Maha-Balipuram—an ancient city about 40 miles from Madras is said to be the capital of King Bali whom Vâman (the 5th incarnation of Vishnoo) drove into the nethar worlds or the *Patal* His dominion it is said was on the uplands of the Sahyadri and thence he was dislodged and driven down into the plains (पाताल)

The Sohrab (सोहराब) District of Mysore is said to be the Surabhi or desire-giving cow of Vasistha Rishi The land is extremely fertile and that circumstance enabled the sage to offer a splendid hospitality to King Vishwamitra which excited the latter's cupidity, and he wanted to dispossess the Rishi of his rich possession.

I have already remarked that the Aryans, as they went further and further south, gave old names to new places. They also seem to have gone a step further and fathered old tales upon new countries Other instances are given below

AHICHHATRAPURA THE HAIG or HAVIK Brahmins are said to have come from this town which to day is known by the name RAMNAGAR in Rohilkhand. The Prashnora Nāgars are also said to bolong to this place.

Hari-Har on the Tunga Bhadra river is said to be the capital of GUHASUR.

CHITALDURGA–the capital of Hidimbasoor.

MAHISHASUR (modern Mysore) is said to be the capital of the Asur king Mahisha, probably the king of the present Todas. A picturesque hill near the modern town about a thousand ft in height, holds a fine temple dedicated to Chamunda Devi the family goddess of the Maharaja The hill is called CHAMUNDI after this deity A fine view of the city is obtained from this temple

The Vanar Senas of Rama:–From very old times it has been generally taken for granted that the army of Rama was composed of real monkeys with tails and high jumps and all the antics of our common ancestors There are numberless stories relating to these. their characteristics in the Ramayana The generals of Rama such as Sugriva, Nal, Neel, Jambuvanta and Hanumana are described in popular vernacular literature, as if they were real monkeys and even saints like Ramdas and learned poets like Vaman Pandit and Moropant have fallen victims to this popular delusion The famous Nag kings of the Purans have similarly been supposed to be real cobras and there are many perversions regarding them. The fact of it seems to be that the events narrated in these Purans had taken place in such ancient and far off days that the people had lost their real meaning and significance This has been intensified by the lack of means of communication between distant countries, and lack of means of preserving, propagating and popularising real knowledge Poets therefore have given a free play to their fertile imagination and have produced what

भिन्न आहे. मला वाटतें मुख्यत्वे मोडीचा अवतार जलद कलमासाठींच झाला आहे व ही सोय साधण्याकरितां बालबोध व पाली ह्या लिपींतून अनुकूल अशीं रूपे तिच्यांत घेण्यांत आली आहेत, व मूळच्या बालबोध रूपांत इष्ट असे फेरफारहि करण्यांत आले आहेत.

रा. गुप्ते ह्यांचे मत असें आहे की, शिवाजी महाराजांचे प्रसिद्ध चिटणीस बाळाजी आवजी प्रभु ह्यांनी ही लिपी शोधून काढिली अथवा बाळबोधीवरून तयार केली. प्रसिद्ध इतिहास संशोधक श्री. राजवाडे ह्यांनां शिवाजी महाराजांच्या कालापूर्वीचे मोडी लेख सापडले असून रा. चांदोरकर ह्यांनी आपल्या पुस्तकाच्या मुखपृष्ठावर ते छापले आहेत. त्यांवरून रा. गुप्ते ह्यांचे म्हणणे निराधार ठरतें.

प्रसिद्ध कै. केरूनाना छत्रे यांचे चिरंजीव कै. कोडोपत छत्रे ह्यांनी बऱ्याच वर्षांपूर्वी एक लेख केसरी पत्रांत लिहिला होता, त्यांत जावा, सुमात्रा वगैरे पूर्वेकडील द्वीपकल्पाच्या प्रवासाचे वर्णन होते. त्यांत त्यांनीं असे लिहिलें आहे की, ह्या द्वीपसमूहांतील ब्रोरोदर ( हे नांव मी आठवणीवरून लिहीत आहे. ) नांवाच्या बेटांत एका प्राचीन हिंदु देवालयांत एक मोडीत लिहिलेला लेख असून त्यांत खालील श्लोक आहे:–

विक्रांतस्याऽवनिपतेः श्रीमतः पूर्णवर्मणः ।

(येथे शहराचे नांव गेले आहे. कोडोपंताच्या मतें ते 'तोराम' असावे)

नगरेंद्रस्य विष्णोरिव पदत्रयं ॥

ह्या वरून मोडीचे प्राचीनत्व जवळ जवळ अशोक कालाशी भिडते.

तात्विकदृष्ट्याहि रा. गुप्ते ह्यांची उपपत्ति संभवीत दिसत नाहीं. नवीन व सोईस्कर लिपी शोधून काढणें (उ.–लघुलेखन पद्धति) ही कल्पना निदान इकडे तरी अर्वाचीन म्हणजे इंग्रजी राज्याच्या स्थापनेनंतरची आहे. मोडी लिपी ही जुनी म्हणजे निदान तीन चारशें वर्षांची तरी आहे, व जुन्या लिपी, कालक्रमानें आस्ते आस्ते रूपांतर पावून बनत असतात हें दुसऱ्या लिपींकडे पाहिलें म्हणजे आढळून येते. शिवाय एखादी सोईस्कर लिपी शोधून

काढणें निराळें आणि तिचा रोजच्या व्यवहारासाठीं सार्वत्रिक प्रसार करून अशा व्यवहाराकरितां लोकांनी तिचा अंगीकार करणें निराळें. यदाकदाचित् बाळाजी आवजी ह्यांनीं ही लिपी शोधून काढिली असें मानिले तरी तिचा प्रसार महाराष्ट्रांत–येवढ्या मोठ्या देशामध्ये–करण्याकरितां त्यांनीं कोणती साधने योजिली त्या विपयी रा. गुप्ते काहीच लिहीत नाहीत. आजच्या सारख्या त्या वेळी शाळा, व छापखाने नव्हते ही गोष्ट लक्ष्यांत ठेविली पाहिजे. शिवाजी महाराजांनी राजव्यवहार कोश तयार करविला होता ही गोष्ट आपणांस माहीतच आहे. मोडी लिपी ही बाळबोधीहून प्राय: इतकी भिन्न आहे की शिवाजी महाराजांच्या आमदानीत प्रचलित हस्तलिपीत येवढा जबर फेरफार करण्यांत आला असता तर त्या विषयी तत्कालीन कागदपत्रात कोठे तरी उल्लेख आला असता, तसा उल्लेख अद्याप आढळण्यांत आला नाहीं.

नाशिककर तीर्थोपाध्याय रा. क्षेमकल्याणी ह्यांच्या वहीतील जे ८९ लेख रा. गुप्ते ह्यांनी छापविले आहेत यांत सर्वात जुना लेख सन १६४३ चा आहे. हा लेख तीर्थोपाध्यायाच्या वहीत आला त्या अर्थी मोडी लिपी त्या कालाच्या आधी पुष्कळ वर्षांपासून व्यवहारांत आली असली पाहिजे. सन १६४३ त शिवाजी महाराजांचे वय अवघे १६ वर्षांचे असले पाहिजे. शिवाजी महाराजांचे पूर्व वय जुन्नर व पुणे प्रांती गेले, त्या वयांतच त्याची व बाळाजी आवजीची गांठ पडली होती की काय हा एक प्रश्न आहे; शिवाय येवढ्या अल्प वयांतच महाराजाच्या महत्वाकांक्षेने येवढी भरारी मारली होती की काय की, जिच्या योगाने बाळाजीपंतास राजदरबारी लिहिण्याच्या सोयीसाठी नवीन लिपी शोधून काढण्याची प्रेरणा व्हावी, हाहि विचार करण्यासारखा प्रश्न आहे.

रा. गुप्ते ह्यांनी प्रसिद्ध केलेल्या मोडी लेखांपैकी ऐशी प्रभु ज्ञातीय गृहस्थांचे असून मात्र पांच लेख इतर ज्ञातीयाचे आहेत ह्या गोष्टीस रावसाहेब कांहींसे महत्व देतात. त्यांचा असे कांही अनुमान काढण्याचा झोक दिसतो की, त्या वेळी दरबारी जाबसाल लिहिण्याचे काम

मुख्यत्वें प्रभुज्ञातीय गृहस्थांच्या हातीं असे. बाळाजी आवजी हे प्रभुज्ञातीय होते व बाळाजीपंतांनीं शोधून काढलेल्या लिपीचा त्यांच्या ज्ञातीबांधवां-कडून स्वाभाविक रीतीनेच विशेष आदर झाला असला पाहिजे व म्हणून त्या काळीं मोडी लिपीचा प्रचार इतर ज्ञातीपेक्षां प्रभुज्ञातीत विशेष होता. माझ्या मतें ह्या गोष्टीचा खुलासा दुसऱ्याहि एका रीतीने होण्यासारखा आहे. द्वारका, डाकोर, सिद्धपूर वगैरे ठिकाणी माझ्या पहाण्यांत असे आलें आहे कीं, प्रायः सबंध ज्ञातीचे उपाध्येपण अमुक एका उपाध्याकडे किंवा वंशा-कडे असतें. क्षेमकल्याणी ह्यांजकडे प्रभुज्ञातीचें उपाध्येपण कदाचित असेल व तसें असल्यास त्यांच्या वह्यांत तज्ज्ञातीयांचे लेख विशेष असण्याचा संभव आहे.

आणखीहि एक गोष्ट रा. गुप्ते ह्यांच्या उपपत्तीला बाधक आहे असे मला वाटतें. मोडीमध्ये एकाच अक्षराची निरनिराळीं वैकल्पिक रूपें आहेत. उदाहरण:-च, ख वगैरे. ह्या रूपांतील कांहींचे अगदी मूळ देवनागरी रूपांशी साम्य असून कांहीं विसदृश दिसतात. लिपी नवीन शोधणारा अशीं वैकल्पिक रूपें कशाला काढील? ह्या वैकल्पिक रूपांच्या अस्तित्वावरून आणि त्यांच्या मूळ देवनागरी रूपाशीं असणाऱ्या साम्यांतील कमीजास्त प्रमाणांवरून, हीं रूपें हळूं हळू बनत आलीं आहेत असे मानणे प्राप्त होते. हा प्रकार एकट्या मोडीतच आहे असे नाहीं, गुजराथी लिपीतर्हा तसेच आहे, आणि ती लिपी कोणी एका व्यक्तीने बसविली असे अद्याप कोणाचे म्हणणे नाही.

रा. गुप्ते ह्याच्या उपपत्ती संबधाने हे दोन शब्द लिहून रा. चांदोरकर ह्यांच्या मताकडे वळू या.

त्यांचें मत असे आहे की, बुद्धाच्या काळी दोन लिपी प्रचारांत होत्या. देशांतील विद्वानांचा वर्ग देवनागरीचा उपयोग करीत असून तदितर लोक व्यवहारामध्ये पाली लिपीचा उपयोग करीत असले पाहिजेत. बुद्धाने आपले उपदेशाचे काम प्रथम ह्या दुसऱ्या वर्गाच्या लोकांत सुरू केले व बौद्धसंत व प्रेषित ह्यानी बहुजनसमाजास समजावं म्हणून ग्रंथ लेखनासाठी पाली भाषेचा व लिपीचा आश्रय केला आहे. प्राचीन रोमन लिपी आणि ल्याटीन शीघ्र लिपींत ( Cursive script ) हि असेच दोन दोन प्रकार आहेत.

मोठ्या रोमन लिपीवरून मोठी ल्याटीन लिपी निघाली आणि धाकट्या रोमन लिपीवरून ( ग्रंथ छापण्याचें कामीं हल्ली हिचाच उपयोग करितात ) धाकटी ल्याटीन लिपी निघाली असावी असें त्याच्या स्वरूपावरून दिसतें; परंतु आपल्याला असल्या उदाहरणांसाठीं येवढ्या लांबीच्या पल्ल्यावर धाव मारावयास नको. गुजराथेत हल्लीं दोन लिपी प्रचलित आहेत, एक देवनागरी, तिला शास्त्री लिपी म्हणतात व दुसरी गुजराथी. गुजराथींतहि दोन प्रकार आहेत असे म्हटले तरी चालेल, म्हणजे एक छापण्याची व दुसरी हस्तलेखनाची; परंतु ह्या दोहोंत फरक असलाच तर तो मात्र वळणाचा आहे. शास्त्री लिपीचा उपयोग संस्कृत लिहिण्याकडे होतो आणि तिचे नांव अन्वर्थक आहे. दुसरीचा उपयोग रोजच्या व्यवहारांत आणि दरबारी लिहिण्याचे कामी होतो. रा. चांदोरकर ह्यांचें पुस्तक वाचण्यापूर्वी माझा ग्रह असा झाला होता की, मोडी ही केवळ देवनागरी लिपीवरून निघाली आहे व गुजराथी लिपी त्या दोहोंच्या मधल्या स्थितींत आहे. शीघ्रलेखनाच्या सोयीकरिता देवनागरी लिपीचे रूपांतर होण्यास सुरुवात झाल्यानंतर मोडीमध्ये ते रूपांतर पूर्णावस्थेस पोहोचलें व गुजराथींत ते अर्धवट राहिले. हल्लीहि तोच ग्रह कायम आहे; त्यांत फरक येवढाच झाला आहे की, मोडींतील व गुजराथींतील कांहीं अक्षरांत पाली लिपीचे अवशेष निःसंशय दिसतात.

प्रथमतः शीघ्रलेखनास कोणते गुण अवश्य आहेत तें दाखवून नंतर ते गुण धाकट्या ल्याटीनच्या अंगी व मोडीच्या अंगीं सारख्या अंशाने वसत आहेत, हे सिद्ध करून दाखविण्याचा प्रयत्न करीन. ते गुण खाली लिहिल्याप्रमाणे आहेत. ( हे नियम उजवीकडून डावीकडे लिहिल्या जाणाऱ्या उरदू, फारशी वगैरे लिपींसहि लागू आहेत. )

१ लिपी एका सरळ आणि क्षितीजाशीं समांतर अशा ओळींत लिहितां आली पाहिजे.

२ अक्षरें वर्तुळ किंवा लंबवर्तुळाच्या आकाराचीं असलीं पाहिजेत, कारण कोनयुक्त किंवा नागमोडी आकृति काढण्यास अवघड जाते.

३ अक्षरांतील तीव्र व लहान कोन टाळले पाहिजेत.

४ अक्षर लेखणी अगर टाक वारंवार न उचलतां काढतां आले पाहिजे.

५ अक्षरे संधिक्षम असली पाहिजेत म्हणजे ती पुढील अक्षरांशी टाक न उचलतां जोडतां आलीं पाहिजेत.

६ प्रत्येक अक्षराचे स्वरूप अगदी भिन्न असले पाहिजे म्हणजे अनेक अक्षरांच्या आकृति सारख्या किंवा जवळ जवळ सारख्या असतां कामा नये.

७ साधारण काळजी घेऊन लिहिलेला लेख सहज रीतीने वाचतां आला पाहिजे.

८ लेख डोळ्यांस सुबक दिसला पाहिजे.

प्रथमतः रोमन लिपीशी ल्याटीन लिपीची तुलना करून वरील नियमांच्या अनुरोधाने शीघ्रलेखनाच्या सोईसाठीं रोमन लिपींत कसकसे फेरफार होऊन ल्याटीन लिपी तयार झाल्या आहेत हे अनुक्रमाने पाहू.

## सरळ ओळीत लिहिणें.

१ इंग्रजी कित्त्यांमध्ये दोन समांतर ओळी थोड्याशा अंतरावर काढलेल्या असतात. मधील अंतरात अक्षरांचे शरीर काढून त्यांचे फाटे ह्या दोन्ही ओळींच्या पलीकडे न्यावयाचे असतात. ह्या युक्तीच्या योगाने हातास सरळ लिहिण्याची सवय लागून निरनिराळे फाटे व फरडे ह्यांचे आकारमान केवढे असावें हे मनावर बिंबतें. उ.–'*d*' व '*l*' ह्यांचे फाटे बरेच ओळीच्या वर नेले नाहीत तर त्यांचा '*a*' व '*e*' आणि '*c*' शीं घोटाळा होण्याचा संभवआहे. '*b*' व '*i*,' '*h*' व '*n*' ह्यांचीहि गोष्ट अशीच आहे. मोडीतील शिरोरेषेचाहि हाच उपयोग आहे हे पुढे दाखविण्यांत येईल.

## अक्षरें वर्तुळ असणें.

२ ह्या बाबतींत धाकटी ल्याटीन लिपी पूर्णत्वास पोहोचली आहे असे म्हटले तरी चालेल '*l*' '*l*' व '*s*' अशा अगदी थोड्या अक्षराशिवाय तींतील सर्व अक्षरें लंबगोल किंवा अर्धगोलाच्या आकाराची आहेत.

### तीव्र कोन टाळणें.

३ हे कोन अतिशय त्रासदायक असतात व ह्यांच्या योगानें एकाच टाकांत लिहिण्यास प्रत्यवाय होतो. वस्तुतः पाहिले असतां एक कोन काढावयास दोनदां लेखणी उचलावी लागते. रोमन लिपींत ह्या कोनांची अगदीं गर्दी आहे. उ.–'A' ' E ' ' F ' ' H ' ' K ' ' L ' ' M ' 'N' 'T' 'V' 'W' 'Y' 'Z' इत्यादि. थोरल्या ल्याटिनमध्यें ह्या कोनांस गोल स्वरूप देण्यांत आलें आहे. उ.–*A, E, F, H, L, M, S, W, Y.* परंतु थोरली ल्याटिन अक्षरे हीं लिहिण्यास अवजड आहेत म्हणून धाकट्या लिपीत अक्षरांचा गोल आकार वाढविण्यांत आला आहे, आणि अक्षरांतील अंतर्गत गोल किंवा अर्धगोल कमी करून तें अक्षर ओळखण्यास अवश्य तेवढीच त्यांची संख्या ठेवण्यांत आली आहे. उ.–*A* चा a झाला. *B* तील दोन अर्धवर्तुळें काढून टाकून एकच ठेवण्यांत आलें. '*b*' पासून '*d*' चें रूप भिन्न करण्याकरितां '*D*' तील उजवे अर्धवर्तुळ डावीकडे नेण्यांत आलें. '*D*' व '*B*' प्रमाणेंच '*E*' तील वर्तुळे कमी करून एकच ठेवण्यांत आलें, '*e*'. रोमन I चे मोठे ल्याटिन स्वरूप '*I*' असें झाले, धाकट्या ल्याटिनमध्यें त्याचे डोके काढून टाकण्यांत आलें व '*e*' ह्या अक्षरापासून त्यास भिन्न करण्याकरितां एक बिंदु देण्यांत आला. हा बिंदु त्याच्या मूळच्या डोक्याचा अवशेष असावा असें दिसतें. मोठ्या ल्याटिन L मधील वर्तुळे काढून त्यांचे साधे स्वरूप झालें. ( *l* ) *t* ' मधील आडवी रेघ ही त्या अक्षराच्या मूळच्या शिरोभागाचा '*T*' अवशेष दिसते व '*l*' ह्या अक्षरापासून त्यास भिन्न करण्याकरितां ती रेघ कायम राहूं दिली असावी. देवनागरी 'इ' व 'ह' वगैरे अक्षरांची मोडींत अशींच रूपांतरें झालीं असून 'सु' मधील मोडींतील आडवी रेघ व 'ठ' मधील पूज्य हे त्यांच्या पूर्व रूपांचे अवशेष आहेत असें पुढें दाखविण्यांत येईल.

### लेखणी वारंवार उचलावयास न लागणें.

४ धाकट्या ल्याटिन मधील '*i*' आणि '*j*' वरील टिंबें व 'टी' ची आडवी रेघ ह्यांशिवाय बाकीची सर्व अक्षरें एकाच टाकांत लिहितां

येतात, व ह्या बाबतीत ही लिपी पूर्णत्वास पावली आहे असे म्हणण्यास प्रत्यवाय नाही; परंतु रोमन लिपीची तशी स्थिति नाही. *C*, *O*, S, सारखीं काही अक्षरे वगळून बाकीची अक्षरे काढावयास दोहोंपासून पांच वेळ लेखणी उचलावी लागते. जसें E, F, M, W, इत्यादि.

**अक्षर उजवे अंगास व शिरोरेषेंत संपणे.**

५ ल्याटिन व मोडी लिपी ह्या दोन्ही डावीकडून उजवीकडे लिहिल्या जातात. पांचव्या नियमाच्या पूर्ततेसाठीं अक्षरांमध्ये दोन गोष्टींची गरज आहे, एक ते अक्षर डावीकडे सुरू होऊन उजवीकडे संपणे, व दुसरी ते अक्षर शिरोरेषेत किंवा होईल तितके तिच्या नजीक संपणे. शीघ्र लिपीच्या ह्या दोन गरजांमुळें धाकटी ल्याटिन व मोडी ह्या लिपींत त्यांच्या मातृलिपीशी ताडून पाहतां अत्यंत फेरफार झाले आहेत असे आढळून येते. धाकट्या ल्याटीनमधील सर्व अक्षरांत एक शेवटीं वर्तुळाकार फाटा असतो, व हा फाटा शिरोरेषेच्या जवळ संपतो. हा फाटा हे अगदीं नवे पादपूरण दिसते व मूळ लिपींत त्याला आधार नाहीं. उ.– '*a*', '*c*', '*d*' इत्यादि. ह्याच फाट्यांमुळे ह्या लिपीच्या अंगीं उत्तम प्रकारची संक्षिप्तता आली आहे. इंग्रजींतील '*q*' प्रमाणे काना उलटवणे व अशाच दुसऱ्या क्लृप्त्या ह्या संक्षिप्ततेसाठीच मोडींत दाखल झाल्या आहेत, त्यांचा विचार पुढे करण्यांत येईल.

**अक्षरांचीं स्वरूपे भिन्न असणे.**

६ जवळ जवळ सारख्या आकाराच्या अक्षरांत रूप भेदासाठीं काय युक्त्या योजिल्या आहेत त्याचे दिग्दर्शन वर येऊन गेले आहे. उ –'*a*' '*b*' '*d*' '*e*' '*i*' '*l*' इत्यादि. ह्या ठिकाणीं येवढे सांगून ठेवणे अवश्य आहे कीं, हलगर्जीपणानें लिहिलेल्या लेखांत '*c*' '*e*' '*i*' '*l*' इत्यादि अक्षरांचा घोटाळा होतो व त्या लिपींत हे एक व्यंगच आहे असें म्हटले पाहिजे. मोडींतहि तसा प्रकार आहे आणि ह्यांत नवल करण्यासारखे कांहीं नाहीं. धाकट्या ल्याटिनमध्यें एका लंब गोलाला (*o*) सव्वीस रूपें नटावीं लागलीं आहेत आणि मोडीकरितां नुसती साधीं निदान चारशे

आठ अक्षरे तयार करावी लागली ( ह्यांत जोडाक्षरांचा समावेश केला नाही ) ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे. पारशी लिपीतील पुष्कळ अक्षरांचा अगदी एकच आकार असून त्या अक्षरांस भिन्नता आणण्या-करितां एकापासून चार नुकते ऊर्फ टिंबे व अशीच दुसरी चिन्हे लावण्याची पद्धति असून तिजमुळें त्या लिपीस फार दुर्वाच्यता येते. हे नुकते काळ-जीपूर्वक दिले नाही तर 'श्वजनाचे' ठिकाणी 'स्वजन' असे सहज वाचलें जाईल.

## लेख सुवाच्य असणें.

७. ह्या संबंधानें विशेष लिहिण्याची जरूर नाही, कांहीं इंग्रजी अधिका-ऱ्यांचा असा समज झालेला दिसतो की ल्याटिनपेक्षां मोडी लिपी जास्त दुर्बोध आहे व त्याचें कारण असे सागण्यांत येते कीं, साहेबांस मोडी वाचण्याची पंचाईत पडते; परतु साहेबांनी लिहिलेले इंग्रजी, दुर्बोध अस-ल्याविषयीं नेटिव्ह कारकुनलोक कधी कागाळी करीत नाहींत, परंतु एखाद्या खरडेघाशानें छाती निधडी करून आपल्या साहेबास सांगितले की आपले अक्षर दुर्वाच्य आहे, तर त्याची काय दशा होईल याची कल्पना करितां येणे जरा कठीण आहे. मी पुन्हां या विषयाकडे वळेन.

## लेख सुबक दिसणें.

८ लेखाचा सुबकपणा ही अभिप्रायाची गोष्ट आहे. धाकट्या ल्याटिन लिपीचे शीघ्रलेखनास अनुकूल असे स्वरूप कशा रीतीने प्राप्त झाले आहे त्याचे वर दिग्दर्शन केलें आहे. आतां ह्याच दृष्टीने मोडीच्या गुणावगुणांचें निरीक्षण करू.

## सरळ ओळींत लिहिणें.

९ मोडी अक्षरांचेहि सामान्य स्वरूप वर्तुळ असल्याने तीं एका ओळींत लिहिता येतात. देवनागरी, व पाली ह्या दोन लिपींतून निघालेल्या गुजराथी लिपीत शिरोरेषा नसते, तथापि तिचे अस्तित्व कल्पावे लागतें. मोडींत ही शिरोरेषा प्रत्यक्ष दाखल झाल्याने तिचा बांधा रेखीव आणि आटोपशिर झाला आहे, परंतु त्या रेषेचा आणखीहि महत्वाचा एक उपयोग आहे. कांहीं अक्षरांच्या रूपभेदाकरितांहि तिची अवश्यकता आहे.

मोडीतील चा', ची,' 'तु' 'खु' व 'सा' इत्यादि अक्षरांत 'चा व 'सा' ची वेलांटी ओळीपाशी थांबते व 'ची' ची वेलांटी ओळीच्या वर न्यावी लागते. 'तु' ची उभी रेघ ओळीपाशी थांबते, 'द्द' ची बरीच वर न्यावी लागते. *a* व *d* वगैरेच्या फाट्यांच्या अशाच स्वरूपाविषयीं वर लिहिले आहेच.

## अक्षरें वर्तूळ असणें.

२ मोडी अक्षरांच्या अंगीं धाकट्या ल्याटीन अक्षरांइतका वर्तुळपणा नाहीं हे कबूल केले पाहिजे, परतु देवनागरी व गुजराथी अक्षरांपेक्षां ह्या बाबतींत ती पुष्कळ पुढे गेली आहे ह्यांत संशय नाहीं. उदाहरणार्थ.—ख, तु, कु वगैरे मोडी अक्षरांचे स्वरूप पहावें.

## ३ तीव्र कोन नसणें, ४ टाक वारंवार न उचलणें, ५ अक्षरें संधिक्षम असणें.

४–५–६ ह्या नियमांचा एकत्र विचार करूं. ह्या बाबतीत देवनागरी लिपी ही अत्यंत गैरसोईची आहे. तिच्या अक्षरात कोन व नागमोडी ही खचून भरली आहेत व पुष्कळ अक्षरांचे शेवट उभी रेषा असते. कोना प्रमाणेच ह्या उभ्या रेषाहि शीघ्रलेखनास अडचणकारक असतात, त्या लिहिण्यासाठी लेखणी उचलावी लागते अथवा शिरोरेषेपाशीं जाऊन पुन्हां त्याच रस्त्याने हात खाली वळवावा लागतो. बाळबोधीत 'आ' ह्या स्वराचे चिह्न उभी रेघ असल्याने ह्या उभ्या रेघात अधिकच भर पडते व तितकीच लिहिण्याची अडचणहि वाढते. ल्याटिन प्रमाणेच मोडीत व काही अंशी गुजराथीत ह्या सर्व अडचणीचा परिहार करण्यांत आला आहे, म्हणजे कोनास व नागमोडीस गोल आकार देण्यात आला आहे. शेवटच्या उभ्या रेघा अजीबात अगर अंशत: गाळण्यांत आल्या आहेत किंवा त्या अर्ध 'म' च्या आकाराने अक्षराच्या मुख्य शरीरास जोडण्यांत आल्या आहेत, व फाजील वर्तुळे व वळणे काढून टाकून अक्षरभेदासाठीं जरूर तेवढींच ठेवण्यात आलीं आहेत. आपण उदाहरणे घेऊन हें स्पष्ट करूं. देवनागरी 'अ' काढण्यास तिनदां टांक सोडावा लागतो. गुजराथी 'अ' चे स्वरूप (અ) असे आहे, म्हणजे देवनागरीतील खालील वर्तुळ उजवीकडे वळवून त्यास मधली आडवी रेघ जोडली आहे व ती काढून नंतर तीसच उभी रेघ जोडली

आहे. ह्या फेरफारामुळे गुजराथी अ एका टाकांत काढण्याची सोय झाली आहे. मोडींतील अ कारात मुळाक्षरातील पहिले अर्ध कायम आहे, मधली आडवी रेघ काढून टाकिली आहे आणि उभी रेघ अक्षराचे शरीरास जोडून वर नेऊन शिरोरेषेस मिळविली आहे. ह्या फेरफारामुळे मोडींत 'अ' कारांत गोलपणा, संधिक्षमता आणि एका टाकात लिहिले जाणे हे तिन्ही गुण आले आहेत. गुजराथी 'अ' त पहिला व तिसरा हे गुण आहेत पण संधिक्षमता नाही व ह्यामुळे त्याची जागा देवनागरी व मोडी ह्याचे मध्ये येते. मोडी 'आ' ची स्थिती अ प्रमाणेच आहे. परंतु मुळातील दोन उभ्या रेघा अर्धे 'म' च्या आकाराच्या फाट्याने जोडून शिरोरेषेस मिळविल्या आहेत, गुजराथी 'आ' त काने कायम आहेत त्यामुळे तो एका टाकात लिहू शकत नाही आणि पुढील अक्षरास जोडताहि येत नाही. बहुतेक गुजराथी अक्षरांची हीच स्थिति आहे, म्हणजे त्यात काने कायम आहेत. अक्षरास गोलपणा मात्र दिला आहे, परंतु ती संधियोग्य नाहीत त्यामुळे त्याचा नंबर देवनागरी व मोडी ह्याचे मध्ये लागतो. देवनागरी 'इ' ची गोष्ट 'अ' हूनहि अधिक चमत्कारिक आहे, तीस अक्षर म्हणण्यापेक्षा मापाचा फराटा म्हणणे अधिक शोभेल. तीन उभी रेघ, कोन, वळणे वगैरे सर्व अडचणी भरल्या आहेत. ह्या सर्वांस धुडकाऊन मोडींत व गुजराथींत 'इ' स त्वचगोलाचे स्वरूप दिले आहे, व तीस संधियोग्य केली आहे. 'उ' ची मोडी व गुजराथी रूपे जवळ जवळ सारखीच आहेत. गुजराथी रूप संधिक्षम नाही. 'उ' हा स्वर, व्यंजनास जोडण्याची पद्धति फार त्रासदायक आहे. गुजराथींत ती जशीच्या तशी राहिली आहे, व अडचणीहि तशाच कायम आहेत हे उघड आहे. मोडींत हा स्वर जोडण्याची पद्धति अगदी सोपी, शीघ्रगतीस अनुकूल आणि संधिक्षम केली आहे. मोडींतही 'उ' काराची चिन्हे अशा खुबीने जोडिली आहेत की, ती व्यंजनाच्या शरीराचा बेमालूम असा भाग होतो. देवनागरी 'ची' 'गी' आणि 'जी' ह्यांची गुजराथी रूपे 'ची' अथवा 'ચી' 'ગી' व 'જી' अशी आहेत. देवनागरीतील 'कु' 'खु' 'गु' 'घु' ची मोडी व गुजराथी रूपातील फरक उघड आहे. ह्या सर्व अक्षरास मोडींत गोलपणा आला असून ती बहुतेक एका टाकात काढता येतात. स्वराचे हे विवेचन पुरे करण्या पूर्वी दोन गोष्टींचा

उल्लेख करून ठेवणे इष्ट आहे. पहिली ही कीं तुलना करूं पहातां ह्या स्वरांचीं रूपे ' पाली ' पेक्षां देवनागरीशी अधिक मिळतीं येतात, दुसरी ही कीं, मोडींत ' इ ' ची व ' उ ' ची ऱ्हस्व दिर्घाची चिन्हें आहेत असें म्हणतात पण बहुजनसमाजाने हा पांडित्याचा कीस वैय्याकरणी, पंडित व शास्त्री ह्यांच्या गळ्यांत बांधून तो मोकळा झाला आहे. ही कटकट काढून टाकल्याने मूळ अक्षरांच्या असलेल्या फारच मोठ्या सख्येत अडुसष्ट अक्षरे कमी झाली आहेत ( ३४ × १२ = ४०८ – ३४ × २ = ६८ ) म्हणजे मोडी बाराखडी दहाच अक्षरांची झाली आहे, ( एक ' इ ' व एक ' उ ' काढून टाकून ) एका दृष्टीनें हा फायदा आहे, पण ह्या सबधाने मतभेद असणे शक्य आहे. गुजराथीत हीं चिन्हे कायम आहेत, परंतु व्यवहारांत व जाबसाली लिहिण्यांत त्यांकडे लक्ष पुरविण्यात येत नाहीं. कित्येकांचे मते हीं चिन्हे मोडींत कायम ठेवावीं असे आहे. त्याची वाट गुजराथी प्रमाणे लागणार, म्हणजे व्यवहारांत व जाबसाली लिहिण्यांत त्यांजकडे दुर्लक्ष होणार हें उघड आहे, कारण हा ऱ्हस्वदीर्घाचा भेद न पाळल्यानें अर्थाचा विपर्यास होण्याची भीति नाहीं व बहुजनसमाज हा नेहमी ' अर्थरि तात्पर्य ' अशाच मताचा असणार.

आतां आपण व्यजनाचा विचार करू. शीघ्र लेखनासाठीं ' ट ' वगैरेची उभी रेघ मोडींत व गुजराथीत कायम ठेविली आहे. आणि ह्या दोन्ही लिपींतील त्यांची आकृति सारखीच असून मात्र तीं अक्षरें काढण्याच्या फरकामुळे मोडी ' ट ' संधिक्षम झाला आहे. मोडी ' ट ' खालून वर म्हणजे उलटा काढतात व तो शिरोरेषेत संपतो. ' ड,' ' च,' ' ट,' ' त ' आणि ' स ' ह्या अक्षरांचें मोडी स्वरूप देवनागरीपेक्षां पालीशी जास्त मिळते येते. गुजराथीत व मोडींत ' च ' चे जे वैकल्पिक रूप आहे ते शुद्ध पालीच आहे, ( च ) व गुजराथींतील ' स ' चे वैकल्पिक रूपहि पालीच आहे.

ज्या मोडी अक्षरासंबंधाने विशेष खुलाशाची अपेक्षा आहे तीं अक्षरे खालीं दिलीं आहेत. म्हणजे ' क ' ' का ' ' ख ' ' ज ' ' थ ' ' द ' ' ध ' ' ब ' ' भ ' ' य ' ' र ' ' ल ' ' व ' ' स '

'ह' 'ञ' 'कु' 'खु' 'गु' 'जु' 'ढु' 'फु' 'सु' आणि 'हु'.

'क' चें स्वरूप पाली किंवा देवनागरी ह्या दोहोंशीहि सकृद्दर्शनी मिळते दिसत नाहीं, व हा कसा निघाला असेल हा प्रश्न उभा रहातो, परतु गुजराथी 'क' च्या रूपानें ह्या गोष्टीचा उलगडा लागतो. गुजराथींत 'क' '५' असा म्हणजे तिरपा काढतात, व हे रूप गुप्त लिपीच्या 'क' शी जुळते, परंतु संक्षिप्तता हें मोडीचे खास अवतारकार्य असल्याने गुजराथी '५' चे शेवटचे टोक खालीच सोडून न देता उलट्या कान्याचे आकारानें ते अक्षर ओळींत पुरे केले जाते. मोडींत काना ( 'आ' काराचा ) जोडण्याची रीति 'म' ह्या अक्षराच्या उत्तरार्धासारखी आहे, हें पूर्वी सांगितलेच आहे. 'का' प्रमाणेंच 'या' 'भा' 'मा' वगैरेंचीहि रूपे बनलीं आहेत आणि संधिक्षमता हे ह्या जोडाचें मुख्य कारण आहे हें त्यांच्या स्वरूपावरूनच दिसते.

'कु' चा इतिहास किंचित् मौजेचा आहे. 'उ' काराचे चिह्न देवनागरीत व गुजराथींत निराळे जोडल्याशिवाय इलाज नाहीं, म्हणजे टाक उचलावा लागतो; हें टाळण्यासाठी तें चिन्ह मोडींत तीन रीतींनीं जोडण्याची युक्ति केली आहे असे दिसतें. (१) अक्षराच्या सुरवातीस (२) मध्यें (३) व शेवटीं. 'कु' मध्यें उकार आधींच लिहून नंतर मोडी 'क' त्यास जोडला जातो. 'फु' 'जु' वगैरेला 'उ' कार मध्यें जोडला जातो, म्हणजे आधीं अर्धा 'फ' 'भ' 'न' 'ज' वगैरे अक्षरें काढून मध्येच 'उ' कार जोडला जातो व नंतर तीं अक्षरें पुरी केलीं जातात. मात्र 'नु' व 'जु' आणि 'भु' ह्यांचा घोटाळा होऊं नये म्हणून अक्षर-पुरें करण्याचा भाग 'भु' मध्ये गाठीशीं आणि इतर अक्षरांत गाठीच्या वर शिरोरेषेपाशीं जोडतात. 'बु' 'वु' वगैरे अक्षरांत तो अक्षराचें शेवटी जोडतात्त.

'उ' जोडण्याच्या ह्या विलक्षण खुबीमुळें त्या त्या अक्षरास गोलपणा जोडाची योग्यता व एका टाकांत लिहिलें जाणें हे तिन्ही गुण प्राप्त होतात हे स्पष्ट आहे.

'ख' ची मोडींत दोन रूपें आहेत, पैकीं दुसरे ( ) गुजराथी रूपा-प्रमाणेंच आहे. मोडीचीं दोन्हीं रूपें प्रचलित देवनगरीच्या रूपाशीं मिळत नाहीत. प्राचीन काळी पुष्कळ कालपर्यंत 'ष' व 'ख' हे एकच होते, म्हणजे मूर्धन्य 'ष' आणि कंठ्य 'ख' ह्यांचा उच्चार सारख्याच रीतीनें होत असे; हा कदाचित् यजुर्वेदाचा परिणाम असेल. त्या वेदांत 'ष' चा उच्चार 'ख' असाच करितात. मला वाटते बंगाल्यांत लिहिल्या जाणाऱ्या देवनागरींतही 'ख' 'ष' सारखा लिहितात. गुजराथी व मोडी वैकल्पिक रूपें हीं दोन्ही 'प' वरूनच निघाली आहेत हे उघड दिसते. मोडीचे दुसरें रूप कांहींसे क्षत्रप रूपासारखे आहे, किंवा ते मोडीच्या पद्धतीप्रमाणें 'प' वरूनहि निघाले असेल.

'खु' चे रूपही मौजेचें आहे ती देवनागरी 'षु' ह्या रूपावरून निघाली आहे, परंतु लेखनसौकर्यार्थ 'प' कार काढून टाकून त्याला फोडण्याची आडवी रेघ मात्र राखिली आहे. तेणेकरून ती 'तु' च्या मोडी रूपापासून भिन्न होते; म्हणजे इंग्रजी 'b' 'c' 't' 'i' वगैरे अक्षरात झालेलें रूपांतर ह्या अक्षरात दिसते.

मोडी 'गु' काराची हीं अशीच स्थिती आहे. तीतील उलटा अर्ध-चंद्र हा मूळचा पाली किंवा क्षत्रप लिपींतील असून त्यास 'उ' कार जोडला आहे. हा पालीचा अवशेष 'गु' कारात मात्र दिसतो, इतरत्र 'ग' देवनागरी' प्रमाणेंच काढला जातो. मोडी 'सु' चाहि असाच प्रकार आहे, त्यांविषयीं पुढें लिहिण्यात येईल.

मोडी व गुजराथी दोन्हीं लिपींत 'च' ची दोन वैकल्पिक रूपे आहेत. पहिले रूप पालीचे आहे. मोडी दुसरे रूप त्याच रूपावरून निघालें आहे. गुजराथी दुसरे रूप देवनागरीवरून निघाल्यासारखे दिसते. सधीकरितां मोडी दोन्हीं रूपे 'ट' प्रमाणेच खालून वर अशी लिहिली जातात. म्हणजे ती ओळींत सपतात.

माझ्या मते मोडी व गुजराथी 'ज' चा पालीशी सबध लावणे कठिण आहे, किंबहुना ते अशक्य आहे. ते देवनागरी रूपावरून सहज निघते.

'ज' चें उघडें तोंड मिळवून तो एका टाकांत काढला म्हणजे झालें. गुजराथी 'जी' साधिक्षम नाही, मोडी 'जी' संधिक्षम आहे. 'जा' चा आकार 'का' 'मा' वगैरेप्रमाणे तयार झाला आहे. 'जु' विषयीं पूर्वी लिहिलें आहेच.

'त' चा मोडी आकार व गुजराथी आकार देवनागरी व क्षत्रप 'त' शीं मिळतो. 'तु' ला मोडींत गोल वळण देऊन 'त' कारांतील पहिल्या अर्धवर्तुळास अर्धचंद्र दिला आहे, त्यामुळें मोडी 'तु' कारांत शीघ्रलेखनास अवश्य ते तिन्ही गुण आले आहेत.

'थ' 'प' वगैरेंची मोडी आकृति एक सारख्याच रीतीनें देवनागरीवरून निघाली आहे. जोडण्याचे सोईसाठीं त्यांतील शेवटची उभी रेघ उलटवून ती शिरोरेघेत संपविली आहे व नंतर त्या अक्षरांस गोलपणा दिला आहे.

देवनागरी 'द' ची आकृति 'इ' प्रमाणेच अवघड आहे, गुजराथी 'द' क्षत्रप 'द' शीं मिळता आहे. मोडींत त्याच 'द' चे शेवटचें टोक वर घेऊन शिरोरेघेंत मिळविलें आहे, त्यायोगें ते गोल व जोडण्यास सोपें झाले आहे. मोडी 'दा' व 'दु' मध्ये क्षत्रपरूपेच कायम दिसतात.

मोडी 'न' ची स्थिती 'ज' सारखीच आहे. दोहोत अंतर येवढेंच आहे की 'ज' चे डोकें पोकळ व 'न' चें भरीव असतें व मूळ देवनागरीतहि त्यांचीं डोकी तशींच आहेत.

मोडी 'भ' मध्यें काना कायम राहिला आहे. तो 'म' प्रमाणें कां जोडिला नाहीं असा प्रश्न निघेल, उत्तर असें कीं तसें जोडल्यानें त्याचें स्वरूप मोडी 'जा' सारखें होईल; परंतु जेथें अशी भीति नाहीं तेथें तसें स्वरूप केलें आहे, उदाहरणार्थः–'भी'.

'ज' प्रमाणेंच तोंड मिळवून टाकून व काना काढून टाकून मोडी 'य' बनला आहे. विकल्पें देवनागरी 'य' ही वापरतात.

मोडी ‘ र ’ हा मोडीत लिहिण्याचे ४ प्रकार आहेत. हे सर्व देवनागरीतून सहज निघू शकतात. ( र न ) ) चवथा प्रकार म्हणजे मुख्य अक्षराचा काना जमेस धरून त्यालाच वेलाच्या आकाराचा ‘ र ’ जोडणे.

‘ स ’ ची मोडी स्वरूपे दोन आहेत. ( ञ व ७ ) पहिले देवनागरीवरून सांधे जोडून झाले आहे, दुसरे पाली ‘ स ’ शी मिळते आहे. गुजराथींतहि ह्याची दोन्ही रूपे आहेत. ( स, २ ) एक शुद्ध देवनागरी व दुसरे पाली असे आहे. मोडी ‘ सु ’ मध्ये गुजराथी ‘ स ’ प्रमाणेच पालीचे रूप जसेच्या तसे ठेविले आहे. मोडी ‘ ह ’ हे देवनागरी ‘ इ, द ’ वगैरे सारखे गोलाकार देऊन व सांधे जोडून टाकून तयार केले आहे. ‘हा’ मधील काना जोडण्याची रीत ‘ भा ’ व ‘ का ’ हून किंचित् भिन्न आहे, म्हणजे ‘ हा ’ चा काना उलट पूज्य घेऊन जोडिला आहे, असे अक्षर पाहताच दिसते. ‘ या ’ प्रमाणे जोडिला नसता तर तो मोडी ‘ व ’ झाला असता.

आता काही जोडाक्षरे घेऊ. देवनागरी ‘ ष्ट ’ काढण्यास तिनदा टाक उचलावा लागतो, सांधे जोडून मोडीत तो एक किंवा दोन टाकात निघतो, मोडी ‘ कृ ’ चे ही तसेच आहे. देवनागरी ‘ श्री ’ काढण्यास पांच टाक लागतात मोडीत तेच अक्षर एका टाकात काढण्याची सोय झाली आहे.

येवढे विवेचन पुरे आहे. सारांश मागावयाचे हे की मोडी रूपांचा विचार करिता तीन मुख्य कारणांच्या अनुरोधाने ती बनली आहेत असे वरील विवेचनावरून स्पष्ट होईल अशी मला आशा आहे. तीं तीन कारणे खालीं दिलीं आहेत.

( १ ) वर्तुळे, वळणे, कोन वगैरे शीघ्रगतीस विघातक अशा आकृत्या कमी करणे, ( २ ) अक्षरे संक्षिप्त करणे, ( ३ ) लेखन सौकर्यार्थ त्यांस गोलाकार देणे. ह्या तीन गरजा भागविण्याकरितां अनुकूल रूपे देवनागरीतून व पालींतून घेतलीं आहेत. जरूर दिसेल तथें त्याहि रूपांत फेरफार केले आहेत, व जरूर असेल तेथे देवनागरी रूपेहि लिहिण्याची सोय आहे. ‘ ल ’ चे देवनागरी रूपच पुष्कळदा वापरतात. जोडाक्षर लिहितानांहि देवनागरी रूपांचा उपयोग करितात. शीघ्रलेखनाच्या सोयीसाठी गुर्जर

लिपीतहि थोडेफार विकार केले आहेत; परंतु ह्या बाबतीत ती लिपी मोडीच्या फार मागें असून जवळ जवळ देवनागरी इतकीच गैरसोईची आहे, व ह्यामुळे तीस मोडीचें स्वरूप निदान दरबारी लिहिण्यात थोडेसें आले आहे व ते याहूनहि पुढे जाण्याचा संभव आहे. वरील विवेचनात मी असेहि सिद्ध करून दाखविलें आहे की, वर लिहिलेल्या शीघ्र लिपीच्या तीन गरजा भागविण्याकरिता तंतोतंत देवनागरीप्रमाणेच रोमन लिपीत फेर फार होऊन शीघ्र ल्याटिन लिपी निघाली आहे.

## प्रत्येक अक्षराचें स्वरूप भिन्न असणे.

६. ह्या विषयाचाहि वरील विवेचनात उहापोह झाला आहे. उदाहरणार्थे- 'तृ', 'गु', 'खु', 'जा', 'भा'. वगैरेचें विवेचन पहावें. जर साधारण काळजी घेऊन मोडी लेख लिहिला असल तर एका अक्षराच्या बदल्यात दुसरें अक्षर वाचले जाण्याची भीति उरत नाही. मोडी 'क' व 'ला' हीं दोन अक्षरें मात्र अपवाद आहेत.

## लेख सुवाच्य असणे.

७. ह्या विषया संबधाने हल्ली जोराचा वाद चालला आहे. मे. किंकेड साहेब आणि मॅकॉनकी साहेबासारखे अनुभवी आणि वजनदार अधिकारी ह्यांनी मोडीवर शस्त्र उपसले आहे. पुणे, रत्नागिरी वगैरे काहीं जिल्ह्याच्या न्यायाधिश्यामधून तीस फाटा मिळाला आहे, आणि तिचा सबंद माय देशातून, निदान दरबारी लिहिण्यात तरी तिची उचलबागडी होईल अशी भीति वाटण्यास जागा आहे. मोडी लिपी सुवाच्य नाही असा सरकारचाहि ग्रह झाला असावा, कारण १९०० साली सरकारने असा ठराव प्रसिद्ध केला आहे की, बालबोधी किंवा इंग्रजी प्रमाणें मोडीतहि शब्द तोडून लिहिले पाहिजेत.

मोडी लिपी खरोखरच दुर्बोध असेल व बाळबोध लिपीस तिच्या जागीं दाखल केल्याने जर खरोखरच फायदा होण्याचा संभव असेल तर सरकारच्या कृतीस नावे ठेवण्यास जागा रहाणार नाही. वस्तुस्थिति तशी आहे की काय असा प्रश्न आहे.

वर मी अनेक ठिकाणी सप्रमाण सिद्ध करून दाखविले आहे की गुजराथी लिपीची जागा देवनागरी व मोडी यामध्ये येते. तीत व देवनागरीत फारच थोडे अतर आहे, आणि देवनागरी प्रमाणेच तीहि संधिक्षम नाही. तेव्हा मे. किंकेड वगैरेंच्या तर्कपद्धतीप्रमाणे ती अधिक सुवाच्य असली पाहिजे. ती तशी आहे का ? पुण्यास एका खान्याच्या प्रसगी त्यानी जे भाषण केले आणि ज्याचा रिपोर्ट ता. ४ आक्टोबर सन १९०९ च्या टाईम्स ऑफ इडियामध्ये आला आहे, त्यात त्यांनी म्हटले आहे की आपण काठेवाडात असतां ७ वर्षांत गुजराथी लेख बऱ्याच रीतीने वाचावयास शिकलो. पुढे त्यांनी दक्षिणेमध्ये बदली झाल्यावर दोन अर्डाच वर्षेपर्यंत मोडी वाचावयास शिकण्याची इतकी मेहेनत केली की त्यामुळे दृष्टीस देखील मांद्य आले. गुजराथी वाचावयास ते हलके हलके शिकले असे मानिले तरी मोडी शिकण्यास त्यांस गुजराथीहून अधिक वेळ लागला असे मानणे कठीण आहे व हे अनुमान जर योग्य असेल तर दुर्वाच्यपणा मोडीच्या पदरी बाधणे योग्य होईल काय ? वरील विवेचनावरून स्पष्ट दिसून येईल की जेथे शीघ्र गतीने लिहिणे भाग आहे तेथे आमचे गुर्जरबधुहि गुजराथी लिपीस मोडी प्रमाणेच फाटे देऊन संधिक्षम करू लागले आहेत. न्यायखात्यात पुष्कळ वर्षे काम केल्याने गुजराथी लिपीत लिहिलेली कागदपत्रे वाचण्याचा मला बराच अभ्यास झाला आहे, आणि माझा असा अनुभव आहे की गुजराथी लिपीत लिहिलेले जाबसाल्याचे लिहिणे तशाच प्रकाराच्या मोडी लिपीतल्या लिहिण्यापेक्षा अधिक सुवाच्य असत नाही. खेडेगावातील अर्धकच्चे शिकलेले वाणिलोक तर इतके वाईट लिहितात की इजिप्त व आसिरियामधील प्राचीन शिलालेख वाचणारे पंडितही त्यांच्या अक्षरापुढें हात टेकतील.

पेशव्यांचे दफतर मोडींत आहे, आणि ह्या राज्याचेहि जुने दफतर मोडीतच आहे. ह्या दफतरातील लिहिणे दुर्बोध आहे, अशा प्रकारचे कधी अवाक्षरही कोणाच्या तोडाने ऐकूं येत नाही. उलट त्याच्या सुदरपणाबद्दल आणि सुवाच्यतेबद्दल नेहमी प्रशसाच ऐकू येते; हे असे आहे तर मोडीची

अलीकडील दुर्बोधता तीस स्वाभाविक नसून काही आगतुक कारणाने आली आहे असेच अनुमान निघत नाही काय ?

माझ्या अल्प मते हल्ली मोडी अक्षर लिहिण्याची कलाच आमच्यात निकृष्टावस्थेला पोहोचली आहे. त्याची कारणे माझ्या मते खाली दिल्या-प्रमाणे आहेत.––

( १ ) देशांत इंग्रजी भाषेचा पगडा बसून सर्व महत्वाचे लिहिणे तिच्याच द्वारे होऊ लागल्याने मराठी भाषेस व केवळ मराठी जाणणाऱ्यास किंमत उरली नाही.

( २ ) परीक्षा वगैरेसाठी मोडी अक्षर चागले असण्याची जरुर राहिली नाही

( ३ ) शाळातून मोडी अक्षर शिकविण्याकडे द्यावे तसे लक्ष दिले जात नाही.

( ४ ) व ह्या सर्व कारणसमुदायामुळे मोडी लिपी शिकण्याविषयी लोकांची अनास्था.

ह्यापैकी पहिले कारण अपरिहार्य आहे. केव्हाहि झाले तरी राज-कर्त्यांच्या भाषेस महत्व हे असणारच. दुसरे व तिसरे ही कारणे परिहार्य आहेत. आणि त्याबद्दल बंदोबस्त झाला पाहिजे. लोकांमध्ये हल्ली मोडी-विषयी किती अनास्था आहे हे एकाच गोष्टीवरून दिसून येण्यासारखे आहे. हल्ली मोडी किती गिरवीत असलेली मुले क्वचितच पहाण्यात येतात. पुष्कळ गृहस्थ असे आहेत की त्याचे शाळातील व विश्वविद्यालयांतील शिक्षण पुरे होऊन ते पोटापाण्याच्या धद्यास लागल्यावर मोडी अक्षर शिकतात. मे. विकेट साहेबांस ही गोष्ट माहीत असावीसे दिसते, परतु त्यांनी केला आहे तसा मात्र त्या गोष्टीचा उपयोग करावयाचा नाही. त्याचे मत असे दिसते की महाराष्ट्रीय स्त्रिया व कॉलेजांतील पुष्कळ विद्यार्थी बाळबोधीतच पत्रे लिहितात, म्हणून सरकारी दफ्तरातूनहि मोडी काढून टाकण्यास हरकत नाही. पूर्वी बायका उत्कृष्ट मोडी लिहीत असत आणि मी स्वत अशी अक्षरे पाहिली आहेत. कॉलेजांतील विद्यार्थ्यांनी बाळबोधीत पत्रे

लिहावी हेच मोडीच्या ऱ्हासाचें लक्षण आहे. पूर्व पिढीत अशी गोष्ट नव्हती. व गुरुवर्य डॉ. भांडारकर म्हणतात की ते स्वत: सर्व पत्रे मोडीतच लिहितात, परंतु ज्यास लिहावयाचे त्यास मोडी येत नसते तेव्हा नाइलाजाने बाळबोधीत लिहावे लागते. ह्या कामी शाळामधून मोडी शिकविण्याची पद्धत सुधारणे व मोडी अक्षरास परीक्षांतून जास्त महत्व देणे अगदी अवश्य आहे. ह्या उपरांतही सरकारास एक गोष्ट करिता येण्यासारखी आहे. निदान अवल इंग्रजीत तरी इंग्रजी शिकलेल्याची बिदागी चांगल्या रीतीने होत नसती तर आज मितीस इंग्रजी शिक्षण इतके वाढतेना. ही गोष्ट लक्षात घेऊन राजाश्रय देतेवेळी उमेदवारांची अक्षरे तपासून ज्यांचे मोडी अक्षर सुवाच्य आणि वळणदार असेल त्यावर अधिक कृपाकटाक्ष ठेविल्यास हा हा म्हणता देशातील मोडी अक्षर सुधारेल; मोडीस रजा देण्याचे कारण नाही. मोडी अक्षर सुधारल्याने इंग्रजी अक्षरही सुधरण्याचा संभव आहे, कारण दोन्ही लिपींची वळणे एकाच प्रकारची असल्याने ज्यांचे मोडी अक्षर चांगले असते त्यांचे इंग्रजी अक्षरही चांगले असते असा अनुभव प्रत्यहि येतो.

आता मोडी शब्द तोडून लिहिण्या संबंधाने जो सरकारी ठराव प्रसिद्ध झाला आहे त्याबद्दल दोन शब्द लिहून हा लेख पुरा करतो. मोडीच्या दुर्वाच्यपणा कमी करण्याच्या सद्‌हेतूने प्रेरित होऊन सरकारने हा ठराव प्रसिद्ध केला आहे ह्यांत संशय नाही.

प्रश्न असा आहे की मोडीत शब्द तोडून लिहिण्याची आवश्यकता आहे की काय? मला वाटते की ज्या मनोधर्माने किंवा मानसिक नियमाने आपण, माणसे किंवा पदार्थ ओळखतो त्याच नियमाचा उपयोग वाचण्याच्या कामीही होत असतो. एखाद्या मनुष्याची लांबी, रुंदी किंवा त्याच्या चक्षुनासादि चेहेऱ्याच्या अवयवाची तंतोतंत मापे आपल्यापाशी असून विवक्षित काळी व स्थळी ती मापे आपल्यास ताडून पहाता येतात, म्हणून आपण त्या माणसास ओळखतो असे मुळीच नाही. केव्हा केव्हा आपण इतक्या अंतरावरून माणसे ओळखतो की त्यांचा चेहराहि आपणास नीटसा दिसत नसतो. माणसाच्या बांध्याची ठेवण, त्याची चालण्याची ढब वगैरे अनेक गोष्टीमुळे एखाद्या व्यक्तीशी नित्य संबद्ध असा ठसा आपल्या

मनावर उमटलेला असतो, आणि तशा प्रकारची आकृति पाहिल्याबरोबर मनावरील हा ठसा त्याशी संबंध असलेल्या व्यक्तीचे स्मरण आपणास करून देतो. जेव्हा हा ठसा अस्पष्ट असतो व त्यामुळे व्यक्तीचा बोध मनास होत नाही किंवा अनेक व्यक्ति सारख्याच आकृतीच्या असल्याने विवक्षित व्यक्ति ओळखता येत नाही, तेव्हा मात्र सूक्ष्म निरीक्षण आणि अनुमान वगैरे क्रिया मनांत सुरू होतात. वाचण्याचीहि अशीच पद्धति आहे. आपण प्रत्येक शब्दातील एक एक अक्षर वाचून शब्दाचा बोध करून घेतो असे नाही तर प्रत्येक शब्दाशी त्याच्या सांकेतिक अर्थाची प्रतिमा आपल्या मनात संलग्न झालेली असते, आणि शब्द पाहिल्याबरोबरच अर्थाचा बोध आपल्या मनास होतो. ह्या कामी मागील संदर्भहि महत्वाचे कार्य बजावीत असतो व कोणी वाचीत असला आणि आपण ते अवधानपूर्वक ऐकत असलो व अर्थाचे ग्रहण आपल्या मनाने होत असले, तर पुढील शब्द व केव्हा केव्हा वाक्येहि आपणास अगाऊच सांगता येतात किंवा चुकीचा शब्द वाचल्यास खरा शब्द सांगता येतो.

वर्णलेखाच्या दोन पद्धति आहेत. एक ध्वनिबिंब किंवा श्रुतिचित्र पद्धति, म्हणजे मुखाने शब्दाचा जसा उच्चार करावयाचा तसेच त्याचे कागदावर चित्र काढावयाचे आणि दुसरी अक्षरसमुच्चय पद्धति; हीत उच्चरित ध्वनिहून लिहिलेली अक्षरे भिन्न असून त्याच्या समुच्चयाने वर्णाची सिद्धि होते. उ०.–'का' हा वर्ण उच्चारला जातो तसाच आर्य भाषात लिहिला जातो परंतु इंग्रजीत तोच वर्ण लिहावयाचा असता के+ए (K a) अशी दोन अगदी भिन्नध्वनि अक्षरे लिहून त्या दोन अक्षर समुच्चयाचा वाचतांना उच्चार मात्र 'का' असा करावा लागतो. म्हणजे आर्य पद्धतीत शब्दाचा ध्वनि, त्याचे कागदावरील चित्र व त्याचा अर्थ ह्यांचे तादात्म्य असते परंतु समुच्चयपद्धतीत तसे नसते. ह्या कारणामुळे समुच्चय पद्धतीत प्रत्येक शब्द तोडून लिहिल्या शिवाय गत्यंतरच नाही. एकापेक्षा अधिक शब्द जर तोडून न लिहिले तर त्याच अक्षरसमुच्चयातून अगदीच निराळे व विरुद्धार्थाचे शब्दही बनण्याचा संभव असतो. ह्याची अगदी एक दोन सोपी उदाहरणे घेऊ. 'आप्पाजी' हे मराठी नाव इंग्रजीत 'आप'-'पाजी'

असेही वाचतां येईल. आर्य पद्धतीत तसे होण्याचे मुळीच भय नाही. मोडी जर साधारण काळजीनें लिहिले तर ज्याला मराठी भाषा साधारण येत असेल त्याला तो लेख तोडून लिहिला नाही म्हणून वाचण्यास मुळीच अडचण पडणार नाही. ( उलटपक्षी एखाद्या चांगल्या चित्रकारानेही निष्काळजीपणाने चित्र काढल्यास तो गणपतीचे वानर रेखाटील ) परतु इंग्रजी शब्द जर तोडून लिहिले नाहीत तर प्रत्यक्ष सरस्वतीलाही ते वाचता येणे शक्य नाही. पुष्कळ श्रम आणि खटपट केल्यानंतर कदाचित काही शब्द बसवितां येतील, परंतु ते लेखकाचे उद्दिष्ट असतीलच अशी खात्री नाही. आर्य लेखन पद्धतीमध्ये हा एक अत्यत महत्वाचा फायदा आहे तो तदितर पद्धतीत नाही. इंग्रजी राज्य होण्यापूर्वी इकडे तोडून लिहिण्याची पद्धति कधींच नव्हती, व ज्यांनी हजारो वर्षांपूर्वी उत्तम प्रकारचे व्याकरण आणि शब्दशास्त्र लिहून ते पूर्णावस्थेस आणून ठेविले त्या ऋषी महर्षींस ही कल्पना सुचली नाही म्हणून नव्हे, तर तसे करण्याचे आर्य लेखन पद्धतीत कारणच नव्हते. तेव्हा मोडीची दुर्बोधता कमी करण्याकरिता तिच्यावर ही तोडून लिहिण्याची पद्धति लादणे ह्मणजे ( आणि ती मोडीच्या स्वभावाच्या अगदी विरुद्ध आहे ) टोणग्यास रोग आणि पखालीस डाव देण्यासारखेंच समजसपणाचे आहे.

मे. किंकेड साहेब वगैरे सारख्या गृहस्थांस आपल्या नोकरीच्या आयुष्यक्रमामध्ये ३–४ लिपी व भाषा शिकण्याची मेहेनत पडते ह्याबद्दल त्यांच्याशी सहानुभूति वाटणे शक्य आहे, परतु महाराष्ट्र, गुजराथ, सिंध हे देश युरोपातील एकेका देशाएवढे असून त्यांच्या भाषा व लिपी भिन्न आहेत. तेव्हा त्या शिकाव्या लागतात. म्हणून कुरकुर करण्यात काय अर्थ आहे. युरोपियन लोकानी काळ्या वर्णाच्या लोकाचा योगक्षेम चालविण्याचा महत् भार स्वसंतोषाने आपल्या शिरावर घेतला आहे आणि आपल्या प्रजेच्या भाषा व लिपी शिकणे हे त्या भारापैकीच एक कलम आहे.

ह्या ठिकाणी एका गोष्टीचा खुलासा करणे अवश्य आहे. मे. किंकेड साहेबाचा त्या मवधाने गैरसमज झालेला दिसतो. हल्ली एक लिपी प्रस्तारा-

विषयीं जी सार्वत्रिक वाटाघाट सुरू झाली आहे व ते काम तडीस नेण्यास सभाही स्थापन झाल्या आहेत, त्यांचा हेतु फक्त छापील पुस्तके आणि वर्तमानपत्रे ह्यांत एकलिपी म्हणजे देवनागरी लिपी असावी असा आहे. देशीक विशेष लिपीचे उच्चाटन करावे असा नाही.

विषमप्यमृत क्वचिद्भवेत अमृत वा विषमीश्वरेच्छया ॥

अशी एक कवि कुलगुरूंची उक्ति आहे, आणि सांप्रत प्रसंगी मोडी लिपीस ती ततोतंत लागु पडते. जपान देशाची लिपी चांगली नाही, म्हणून त्यानेहि ल्याटिन लिपीचा स्वीकार करण्याचा उपक्रम सुरू केला आहे. लिहिण्याच्या सोईच्या दृष्टीने त्या ल्याटिन लिपीत असणारे सर्व गुण ततोतंत जिच्यांत आहेत व जी ध्वनिबिंब पद्धतीमुळे ल्याटिनपेक्षां खात्रीने अधिक सरस आहे, त्या मोडी लिपीस त्या गुणसंपत्तीमुळें, तिच्या मायदेशांतच बहिष्कार मिळत आहे, आणि ल्याटिन लिपीचा सर्व जगांत गौरव होत आहे, ह्यापेक्षा विधात्याच्या अगम्य लीलेचे उदाहरण दुसरे सापडणे कठिण आहे. पुष्कळ वर्षे गुजराथी लिहिण्याच्या माझ्या अनुभवावरून मी खात्रीने सांगू शकतो की बाळबोध लिपी ही शीघ्रलिपी ह्या नात्याने अगदीं कुचकामाची आहे. मी वर दाखविलेले गुण शीघ्र लिपीत असलेच पाहिजेत. ते गुण ज्या लिपींत नाहीत अशा लिपीत लिहिण्यास भागच पडल्यास काळ्या डोईचा माणूस आपली सोय लावून घेण्याची धडपड केल्याखेरीज रहाणार नाही, ह्मणजे बाळबोधीस संधिक्षम व शीघ्रलेखनास योग्य अशी करण्यासाठी फाटे व फराटे देण्याची सुरुवात होईल; आणि हळुहळु बाळबोधीच्या ऐवजी मोडीपेक्षां सर्व गुणांने कमी दरजाची अशी एखादी तिसरीच धेडगुजरी लिपी प्रस्थापित करण्याचे पुण्य मात्र सरकार आपल्या पदरीं बांधील. गुजराथीची तशीच स्थिती झाली आहे.

मोडी लिपीचा आह्मां महाराष्ट्रीयांस फार अभिमान आहे, सबब मोडीच्या कैवाऱ्यांस माझी कळकळीची प्रार्थना आहे की त्यांनीं आपली अनास्था सोडून देऊन खरी बाजू सरकारापुढे मांडावी, तसेच मोडी अक्षरांविषयी आपल्यामध्ये जी हल्लीं अनास्था दिसून येते तीहि सोडून

घ्यावी. सगजस मनुष्य नेटाने प्रयत्न करील तर एक दोन महिन्यात चांगले मोडी अक्षर लिहू लागेल. मोडी अक्षर सुंदर न सुवाच्य झाल्यावर सरकारासहि या लिपीस फाटा देण्याचे प्रयोजन उरणार नाही.

**लेख सुबक दिसणे.**

८ ल्याटिन संबंधाने लिहिताना मी ह्मटले आहे की ही केवळ मनाची गोष्ट आहे. चांगल्या मोडी अक्षरांच्या ओळीस आपण नेहमी मोत्यांच्या ओळींची उपमा देत असतो. तसे बाळबोधीस कोणी ह्मणत नाही हे लक्षात वाळगण्यासारखे आहे.

याप्रमाणे शीघ्र लिपीस अवश्य असे सर्व गुण ल्याटिन प्रमाणेच मोडीतहि आहेत असे मी वर यथामति सिद्ध केले आहे. ते वाचून मोडीविषयी किंचितहि आस्था व कळकळ उत्पन्न होईल तर मी आपणास कृतार्थ मानीन. इतके म्हणून हा नीरस निबंध मी पुरा करितो.

पाली वगैरे अक्षरांचीं स्वरूपे समजण्यासाठी ह्या सोबत शेवटी परिशिष्ट व ' स ' ये त्याचा नकाशा जोडिला आहे

# प्राचीन लिपींचें पत्रक

परिशिष्ट ब

## देवनगरी, पाली, गुजराथी व मोडी वगैरे लिपींचे अक्षरांचा नकाशा.

| अनुक्रम नंबर | देव नागरी | गुजराथी | मोडी | पाली: इ.स.की ३ री शताब्दी. | पाली: इ.स.की १२ री शताब्दी. | पाली: इ.स.की १३ वी शताब्दी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | अ | અ | 𑘀 | 𑀅 𑀅 𑀅 𑀅 | 𑀅 𑀅 | अ |
| २ | आ | આ | 𑘁 | 𑀆 | | |
| ३ | इ | ઇ | 𑘂 | 𑀇 𑀇 𑀇 | 𑀇 | इ |
| ४ | ई | ઈ | | | | |
| ५ | उ | ઉ | 𑘄 | 𑀉 𑀉 | 𑀉 𑀉 | |
| ६ | ऊ | ઊ | 𑘅 | | | |
| ७ | ऋ | | | | | |
| ८ | ए | એ | 𑘊 | 𑀏 𑀏 𑀏 | 𑀏 | ए ए |
| ९ | ं | ં | | | | |
| १० | ः | ઃ | | | | |
| ११ | ँ | ઁ | | | | |
| १२ | क | ક | 𑘎 | 𑀓 𑀓 | 𑀓 | क |
| १३ | ख | ખ | 𑘏 | | 𑀔 𑀔 𑀔 | ख |
| १४ | ग | ગ | 𑘐 | 𑀕 𑀕 𑀕 | 𑀕 | ग |

| अनुक्रम नंबर | देव नागरी. | गुजराथी | मोडी | पाली | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | इसकी ३री शताब्दी | इ स २री शताब्दी | इसकी १३वी शताब्दी |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १५ | घ | ઘ | 𑘑 | 𑀖 | 𑀖 | घ |
| १६ | ङ | ઙ | 𑘒 | | | |
| १७ | च | ચ | 𑘓 | 𑀘 | 𑀘 | च |
| १८ | छ | છ | 𑘔 | 𑀙 | 𑀙 | |
| १९ | ज | જ | 𑘕 | 𑀚 | 𑀚 | ज |
| २० | झ | ઝ | 𑘖 | 𑀛 | | |
| २१ | ञ | ઞ | 𑘗 | 𑀜 | 𑀜 | |
| २२ | ट | ટ | 𑘘 | 𑀝 | 𑀝 | ट |
| २३ | ठ | ઠ | 𑘙 | | 𑀞 | ठ |
| २४ | ड | ડ | 𑘚 | 𑀟 | 𑀟 | ड |
| २५ | ढ | ઢ | 𑘛 | 𑀠 | 𑀠 | ढ |
| २६ | ण | ણ | 𑘜 | 𑀡 | 𑀡 | ण |
| २७ | त | ત | 𑘝 | 𑀢 | 𑀢 | त |
| २८ | थ | થ | 𑘞 | 𑀣 | 𑀣 | थ |
| २९ | द | દ | 𑘟 | 𑀤 | 𑀤 | द |
| ३० | ध | ધ | 𑘠 | 𑀥 | 𑀥 | ध |

| अनुक्रम नंबर | देव नागरी. | गुजराथी | मोडी | पाली. इ स. की ३री शताब्दी | इ स की २री शताब्दी | इ स की १३वी शताब्दी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ३१ | न | ન | 𑘡 | 𑀦 𑀦 | 𑀦 | न |
| ३२ | प | પ | 𑘢 | 𑀧 𑀧 | 𑀧 | प |
| ३३ | फ | ફ | 𑘣 | 𑀨 𑀨 | 𑀨 | |
| ३४ | ब | બ | 𑘤 | 𑀩 𑀩 | 𑀩 | |
| ३५ | भ | ભ | 𑘥 | 𑀪 𑀪 | 𑀪 | त |
| ३६ | म | મ | 𑘦 | 𑀫 𑀫 | 𑀫 𑀫 | म |
| ३७ | य | ય | 𑘧 | 𑀬 𑀬 𑀬 | 𑀬 𑀬 | य |
| ३८ | र | ર | 𑘨 | 𑀭 𑀭 𑀭 𑀭 | 𑀭 𑀭 | र |
| ३९ | ल | લ | 𑘩 | 𑀮 𑀮 | 𑀮 𑀮 𑀮 | ल |
| ४० | व | વ | 𑘪 | 𑀯 𑀯 𑀯 | 𑀯 𑀯 | व |
| ४१ | श | શ | टा | | 𑀰 | श |
| ४२ | ष | ષ | ष | | 𑀱 𑀱 𑀱 | ष |
| ४३ | स | સ | 𑘭 | 𑀲 𑀲 𑀲 | 𑀲 𑀲 | स |
| ४४ | ह | હ | 𑘮 | 𑀳 𑀳 | 𑀳 𑀳 | ह ह |
| ४५ | ा | કા | 𑘎𑘰 | | | |
| ४६ | ि | કિ | 𑘎𑘱 | | | |
| ४७ | ी | કી | 𑘎𑘲 | | | |

| अनुक्रम नंबर | देव नागरी | गुजराथी | मोडी | पाली<br>इ स की ३ री शताब्दी | <br>इ स की २ री शताब्दी | <br>इ स की १३ वी शताब्दी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| ४८ | ु | કુ | 𑘎𑘳 | | | |
| ४९ | ू | કૂ | 𑘎𑘴 | | | |
| ५० | े | કે | 𑘎𑘹 | | | |
| ५१ | ै | કૈ | 𑘎𑘺 | | | |
| ५२ | ो | કો | 𑘎𑘻 | | | |
| ५३ | ौ | કૌ | 𑘎𑘼 | | | |
| | १ | ૧ | 𑙑 | | | |
| | २ | ૨ | 𑙒 | | | |
| | ३ | ૩ | 𑙓 | | | |
| | ४ | ૪ | 𑙔 | | | |
| | ५ | ૫ | 𑙕 | | | |
| | ६ | ૬ | 𑙖 | | | |
| | ७ | ૭ | 𑙗 | | | |
| | ८ | ૮ | 𑙘 | | | |
| | ९ | ૯ | 𑙙 | | | |

सदर नकाशा रा. ब. गौरीशंकर ओझा व आचार्य वल्लभजी हरिदत्त व चांदोरकर यांचे नकाशाचे आधारानें केला आहे.